हा वाद येथे तुटावयाचा नाही. हा श्रमण गोतम आमच्या गावाजवळ राहत आहे. तो बुद्ध आहे, पूज्य आहे, आणि सर्व लोकांचा गुरु आहे, अशी त्याची कीर्ति सर्वत्र पसरली आहे. आपण त्याजपाशीं जाऊन आपला मतभेद कळवूं, आणि तो जो निकाल देईल, तो मान्य करूं."

तेव्हा ते दोघे बुद्धापाशीं गेले आणि बुद्धाला कुशलप्रश्नादि विचारून एका बाजूला बसले. आणि वासिष्ठ म्हणाला, "भो गोतम, आम्ही दोघे सुशिक्षित ब्राह्मणकुमार आहोंत. हा तारुक्ष्याचा शिष्य आणि मी पौष्करसादीचा शिष्य आहें. आमचा जातिभेदासंबंधाने विवाद आहे. हा म्हणतो, जन्मामुळे ब्राह्मण होतो, आणि मी म्हणतों, कर्मामुळे ब्राह्मण होतो. आपली कीर्ति ऐकून आम्ही येथे आलों आहोंत. आपण आमच्या वादाचा निकाल द्यावा."

भगवान म्हणाला, "हे वासिष्ठा, तृण, वृक्ष इत्यादिक वनस्पतींमध्ये भिन्नभिन्न जाती आढळतात. तशाच त्या किडे, मुंग्या वगैरे क्षुद्र प्राण्यांमध्येही आहेत. सर्पांच्या, श्वापदांच्या, पाण्यांत राहणाऱ्या मत्स्यांच्या आणि आकाशांत उडणाऱ्या पक्ष्यांच्या देखील अनेक जाति आहेत. त्यांच्या भिन्नत्वाचीं चिन्हें त्या त्या प्राणिसमुदायांत स्पष्ट दिसतात. पण मनुष्यांमध्ये भिन्नत्वाचें चिन्ह आढळत नाही. केस, कान, डोळे, तोंड, नाक, ओठ, भिवया, मान, पोट, पाठ, हात, पाय इत्यादिक अवयवांनी एक मनुष्य दुसऱ्या माणसाहून अगदीच भिन्न होऊं शकत नाही. अर्थात् पशुपक्ष्यादिकांत जशा आकारादिकांनी भिन्नभिन्न जाती आढळतात, तशा त्या मनुष्यप्राण्यांत नाहीत. सर्व माणसांचे अवयव जवळजवळ सारखेच असल्यामुळे मनुष्यांमध्ये जातिभेद ठरवितां येत नाही. परंतु मनुष्याची जात कर्मावरून ठरवितां येणें शक्य आहे.

"एखादा ब्राह्मण गाई पाळून निर्वाह करीत असला, तर त्याला गवळी म्हणावें, ब्राह्मण म्हणूं नये. जो शिल्पकलेने उपजीविका

करतो तो कारागीर, जो व्यापार करतो तो वाणी, दूताचें काम करतो तो दूत, चोरीवर उपजीविका करतो तो चोर, युद्धकलेवर उपजीविका करतो तो योद्धा, यज्ञयागांवर उपजीविका करतो तो याजक, आणि जो राष्ट्रावर उपजीविका करतो तो राजा होय. परंतु यांपैकी कोणालाही जन्मामुळे ब्राह्मण म्हणतां यावयाचें नाही.

"सगळीं संसारबंधनें छेदून जो कोणत्याही प्रापंचिक दुःखाला भीत नाही, कोणत्याही गोष्टीची ज्याला आसक्ति नाही, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. इतरांनी दिलेल्या शिव्यागाळी, वधबन्ध इत्यादि जो सहन करतो, क्षमा हेंच ज्याचें बळ, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. कमलपत्रावरील जलबिंदूप्रमाणे जो इहलोकींच्या विषयसुखापासून अलिप्त रहातो, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों....

"जन्मामुळे ब्राह्मण होत नाही, किंवा अब्राह्मण होत नाही. कर्मानेच ब्राह्मण होतो आणि कर्मानेच अब्राह्मण होतो. शेतकरी कर्माने होतो, कारागीर कर्माने होतो, चोर कर्माने होतो, शिपाई कर्माने होतो, याजक कर्माने होतो, आणि राजा देखील कर्मानेच होतो. कर्मानेच हें सगळें जग चालत आहे. आसावर अवलंबून जसा रथ चालतो, तसे सर्व प्राणी आपल्या कर्मावर अवलंबून राहतात."

हा बुद्धाचा उपदेश ऐकून वासिष्ठ आणि भारद्वाज त्याचे उपासक झाले.

## ब्राह्मण आणि अब्राह्मण सारखेच !

वर दिलेल्या पुरुषसूक्ताच्या ऋचेच्या आधारें ब्राह्मण प्रतिपादन करीत असत की, ब्रह्मदेवाच्या मुखापासून झाल्यामुळे चारी वर्णांत आपण श्रेष्ठ आहोंत. मज्झिमनिकायांतील अस्सलायनसुत्तांत यासंबंधीं बुद्ध भगवंताचा संवाद फारच बोधप्रद आहे. त्या सुत्ताचा सारांश असाः—

एके समयीं बुद्ध भगवान् श्रावस्ती येथे अनाथपिंडिकाच्या आरामांत राहत होता. त्या वेळीं निरनिराळ्या देशांतून पांचश ब्राह्मण कांही कारणास्तव श्रावस्तीला आले होते. त्या ब्राह्मणांमध्ये असा एक प्रश्न उपस्थित झाला की, हा श्रमण गोतम चारही वर्णांना मोक्ष मिळतो असें प्रतिपादन करतो. त्याजबरोबर वाद करून हें त्याचें म्हणणें कोण खोडून काढील? शेवटीं या कामीं आश्वलायन ब्राह्मण-कुमाराची योजना करावी असें ठरलें.

आश्वलायन कुमाराचें अध्ययन नुकतेंच पुरें झालें होतें. निघंटु छंद:शास्त्र इत्यादि वेदांगांसहवर्तमान त्याला चारही वेद तोंडपाठ येत असत. तथापि बुद्ध भगवंताशीं वाद करणें सोपें नव्हे हें तो जाणून होता. बुद्धाशीं वाद करण्यास जेव्हा त्याची निवड झाली, तेव्हा तो त्या ब्राह्मणांना म्हणाला, “भो, श्रमण गोतम धर्मवादी आहे, धर्मवादी लोकांशीं वाद करणें सोपें नाही. जरी मी वेदांमध्ये पारंगत असलों तरी गोतमाबरोबर वादविवाद करण्याला समर्थ नाही.”

बराच वेळ भवति न भवति झाल्यावर ते ब्राह्मण आश्वलाय-नाला म्हणाले, “भो आश्वलायन, तूं परिव्राजकधर्माचा अभ्यास केला आहेस, आणि युद्धावाचून पराजित होणें तुला योग्य नाही.”

आश्वलायन म्हणाला, “गोतमाशीं वाद करणें जरी कठिण आहे, तरी तुमच्या आग्रहास्तव मी तुमच्याबरोबर येतों.”

तदनंतर आश्वलायन त्या ब्राह्मणसमुदायासह बुद्ध भगवंता-जवळ गेला, आणि कुशलसमाचारादिक विचारून झाल्यावर ते सर्वजण एका बाजूला बसले. तेव्हा आश्वलायन म्हणाला, “भो गोतम, ब्राह्मण म्हणतात, ‘ब्राह्मण वर्णच श्रेष्ठ आहे, इतर वर्ण हीन आहेत. ब्राह्मण वर्णच शुक्ल आहे, इतर वर्ण कृष्ण आहेत. ब्राह्मणांनाच मोक्ष मिळतो, इतरांना नाही. ब्राह्मण ब्रह्मदेवाच्या

सुखापासून झाले. ते त्याचे औरस पुत्र. अर्थात् तेच ब्रह्मदेवाचे दायाद होत.' भो गोतम, यासंबंधीं आपलें मत काय?"

भगवान-हे आश्वलायना, ब्राह्मणांच्या बायका ऋतुमती होतात, गरोदर होतात, प्रसूत होतात, आणि मुलांना दूध पाजतात. याप्रमाणें ब्राह्मणांची संतति इतर वर्णासारखीच मातेच्या उदरांतून जन्मली असतां, ब्राह्मणांनी आपण ब्रह्मदेवाच्या मुखापासून उत्पन्न झालों, असें म्हणावें, हें आश्चर्य नव्हे काय?

आ०-भो गोतम, आपण कांही म्हणा. पण ब्राह्मण ब्रह्मदेवाचे दायाद आहेत, यावर ब्राह्मणांचा पूर्ण विश्वास आहे.

भ०-हे आश्वलायन, यौन, कांबोज वगैरे सरहद्दीवरील प्रदेशांत आर्य आणि दास असे दोनच वर्ण असून कधीकधी आर्याचा दास आणि दासाचा आर्य होतो, ही गोष्ट तुझ्या ऐकण्यांत आली आहे काय?

आ०-होय, असें मी ऐकलें आहे.

भ०-असें जर आहे, तर ब्रह्मदेवाने ब्राह्मणांना मुखापासून उत्पन्न केलें व ते सर्व वर्णांत श्रेष्ठ आहेत, ह्या म्हणण्याला आधार काय?

आ०-आपलें म्हणणें कांही असो, पण ब्राह्मणांची अशी बळकट समजूत आहे की, ब्राह्मण वर्णच काय तो श्रेष्ठ, आणि इतर वर्ण हीन आहेत.

भ०-क्षत्रियाने, वैश्याने किंवा शूद्राने प्राणघात, चोरी, व्यभिचार, खोटें भाषण, चहाडी, शिवीगाळ, वृथा बडबड केली, लोकांच्या धनावर दृष्टि ठेवली, द्वेषबुद्धि वाढविली, नास्तिकपणा अंगीकारला, तर तोच काय तो देहत्यागानंतर नरकाला जाईल; पण ब्राह्मणाने हीं कर्मे केलीं, तरी तो नरकाला जाणार नाही, असें तुला वाटतें काय?

आ०—भो गोतम, कोणत्याही वर्णाच्या मनुष्याने हीं पापें केलीं असतां तो मरणोत्तर नरकाला जाईल. ब्राह्मण काय किंवा अब्राह्मण काय, सर्वांनाच आपल्या पापाचें प्रायश्चित्त भोगावें लागणार.

भ०—एखादा ब्राह्मण प्राणघातापासून निवृत्त झाला, चौर्यकर्म, व्यभिचार, असत्य भाषण, चहाडी, शिवीगाळ, वृथाप्रलाप, परधनाचा लोभ, द्वेष आणि नास्तिकता, या (दहा) पापांपासून निवृत्त झाला, तर तोच काय तो देहावसानानंतर स्वर्गाला जाईल, पण इतर वर्णांचे लोक या पापांपासून निवृत्त झाले, तर ते स्वर्गाला जाणार नाहीत, असें तुला वाटतें काय ?

आ०—कोणत्याही वर्णाचा मनुष्य या पापकर्मांपासून निवृत्त झाला तर स्वर्गाला जाईल; पुण्याचरणाचें फळ ब्राह्मणाला काय किंवा ब्राह्मणेतराला काय सारखेंच मिळेल.

भ०—या प्रदेशांत ब्राह्मणच काय तो द्वेषवैरविरहित मैत्रीभावना करूं शकतो; पण क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ती भावना करूं शकत नाहीत, असें तुला वाटतें काय ?

आ०—चारी वर्णांना मैत्रीभावना करतां येणें शक्य आहे.

भ०—तर मग ब्राह्मण वर्णच श्रेष्ठ, आणि इतर वर्ण हीन आहेत, या म्हणण्यांत अर्थ कोणता ?

आ०—आपण कांही म्हणा. ब्राह्मण आपणाला श्रेष्ठ समजतात व इतर वर्णांना हीन समजतात, ही गोष्ट खरी आहे.

भ०—हे आश्वलायना, एखादा मूर्धावसिक्त राजा सर्व जातींच्या शंभर पुरुषांना एकत्र करील, त्यांपैकी क्षत्रिय, ब्राह्मण आणि राजकुलांत जन्मले असतील, त्यांना तो म्हणेल, ‘अहो इकडे या, आणि शाल किंवा चंदनासारख्या उत्तम वृक्षांची उत्तरारणी घेऊन

अग्नि उत्पन्न करा.' आणि त्यांपैकी चांडाळ, निषाद इत्यादिक हीन कुलांमध्ये जन्मलेले असतील, त्यांना तो म्हणेल, 'अहो इकडे या व कुत्र्यांला खावयाला घालावयाच्या दोणींत, डुकराला खावयाला घालावयाच्या दोणींत किंवा रंगाऱ्याच्या दोणींत एरंडाच्या उत्तरारणीने अग्नि उत्पन्न करा.' हे आश्वलायना, ब्राह्मणादिक उच्च वर्णाच्या मनुष्याने उत्तम अरणीने उत्पन्न केलेला अग्नि तेवढा भास्वर आणि तेजस्वी होईल, आणि चांडालादिक हीन वर्णांच्या मनुष्याने एरंडादिकांच्या अरणीने उत्पन्न केलेला अग्नि भास्वर आणि तेजस्वी होणार नाही व त्यापासून अग्निकार्यें घडणार नाहीत, असें तुला वाटतें काय ?

आ०–भो गोतम, कोणत्याही वर्णाच्या माणसाने बऱ्या किंवा वाईट लांकडाची उत्तरारणी करून कोणत्याही ठिकाणीं अग्नि उत्पन्न केला तर तो एकसारखाच तेजस्वी होईल व त्यापासून समान अग्निकार्यें घडून येतील.

भ०–एखाद्या क्षत्रियकुमाराने ब्राह्मणकन्येबरोबर शरीरसंबंध केला व त्या संबंधापासून जर त्याला पुत्र झाला, तर तो पुत्र आईबापांसारखाच मनुष्य होईल असें तुला वाटत नाही काय? त्याचप्रमाणें एखाद्या ब्राह्मणकुमाराने क्षत्रियकन्येशीं विवाह केला व त्या संबंधापासून त्याला पुत्र झाला, तर तो आईबापांसारखा न होतां भलत्याच प्रकारचा होईल असें तुला वाटतें काय ?

आ०–अशा मिश्र विवाहाने जो मुलगा होतो, तो त्याच्या आईबापांसारखाच मनुष्य असतो. त्याला ब्राह्मणही म्हणतां येईल किंवा क्षत्रियही म्हणतां येईल.

भ०–पण आश्वलायना, एखाद्या घोडीच्या आणि गाढवाच्या संबंधापासून जें शिंगरूं होतें त्याला त्याच्या आईसारखें किंवा

बापासारखें म्हणतां येतें काय? त्याला घोडाही म्हणतां येईल, आणि गाढवही म्हणतां येईल काय?

आ०—भो गोतम, त्याला घोडा किंवा गाढव म्हणतां येत नाही. तो एक तिसऱ्याच जातीचा प्राणी होतो. त्याला आपण खेचर म्हणतों. परंतु ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्या संबंधापासून झालेल्या मुलामध्ये असा प्रकार आढळून येत नाही.

भ०—हे आश्वलायना, दोघां ब्राह्मण बंधूंपैकी एक वेदपठण केलेला चांगला सुशिक्षित, व दुसरा अशिक्षित असेल, तर त्यांत ब्राह्मण कोणत्या भावाला श्राद्धामध्ये व यज्ञामध्ये प्रथम आमंत्रण देतील?

आ०—जो सुशिक्षित असेल त्यालाच प्रथम आमंत्रण दिलें जाईल.

भ०—आता असें समज की, या दोघां भावांपैकी एकजण मोठा विद्वान्, पण अत्यंत दुराचारी आहे; दुसरा विद्वान नाही, पण अत्यंत सुशील आहे; तर त्या दोघांमध्ये प्रथमतः कोणाला आमंत्रण दिलें जाईल?

आ०—भो गोतम, जो शीलवान असेल त्यालाच प्रथम आमंत्रण दिलें जाईल. दुराचारी मनुष्याला दिलेलें दान महाफलदायक कसें होईल?

भ०—हे आश्वलायना, प्रथमतः तूं जातीला महत्त्व दिलेंस, नंतर वेदपठनाला, आणि आता शीलाला महत्त्व देत आहेस. अर्थात् मी जी चातुर्वर्ण्यशुद्धि प्रतिपादितों, तिचाच तूं अंगीकार केलास.

हें बुद्ध भगवंताचें भाषण ऐकून आश्वलायन मान खाली घालून चुप्प राहिला. पुढे काय बोलावें हें त्याला सुचेना. नंतर भगवंताने असितदेवल ऋषीची गोष्ट सांगितली. आणि शेवटीं आश्वलायन बुद्धाचा उपासक झाला.

## अधिकार लोकांनी दिला पाहिजे

ब्राह्मणवर्णच श्रेष्ठ आहे आणि इतर वर्ण हीन आहेत, असें म्हणून ब्राह्मण जातीचे पुढारी स्वस्थ बसत नसत. ते चारही वर्णांचीं कर्तव्याकर्तव्यें कोणतीं हें सांगण्याचा अधिकार आपणाकडे घेत, असें मज्झिमनिकायांतील (नं. ९६) एसुकारिसुत्तावरून दिसून येतें. त्यांतील मजकुराचा सारांश असा:—

एके समयीं बुद्ध भगवान् श्रावस्ती येथे जेतवनांत अनाथ-पिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या वेळीं एसुकारी नांवाचा ब्राह्मण त्याजपाशीं आला, आणि कुशलसमाचारादिक विचारून एका बाजूला बसला व म्हणाला, "भो गोतम, ब्राह्मण चार परिचर्या (सेवा) सांगतात. ब्राह्मणाची परिचर्या चारही वर्णांना करतां येते, क्षत्रियांची परिचर्या क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या तीन वर्णांनी करावी, वैश्याची परिचर्या वैश्य आणि शूद्र यांनीच करावी, आणि शूद्राची परिचर्या शूद्रानेच करावी. इतर वर्णाचा मनुष्य त्याची परिचर्या कशी करील? या परिचर्यासंबंधाने आपलें म्हणणें काय आहे?"

भ०—हे ब्राह्मणा, या ब्राह्मणांच्या म्हणण्याला सर्व लोकांची संमति आहे काय? अशा परिचर्या सांगण्याला लोकांनी त्यांना अधिकार दिला आहे काय?

एसु०—भो गोतम, असें नाही.

भ०—तर मग, एखाद्या मांस खाऊं न इच्छिणाऱ्या गरीब माणसावर त्याचे शेजारी मांसाचा वाटा लादतील आणि म्हणतील की, हें मांस तूं खा आणि याची किंमत दे! त्याचप्रमाणें लोकांवर ब्राह्मण ह्या परिचर्या लादीत आहेत, असें म्हणावें लागतें. माझें म्हणणें असें की, कोणत्याही वर्णाचा मनुष्य असो, ज्याची परिचर्या केल्याने कल्याण होतें, अकल्याण होत नाही, त्याचीच परिचर्या करणें योग्य आहे. चारी वर्णांच्या समंजस माणसांना विचारलें असतां ते देखील असेंच

मत देतील. उच्चकुलांत, उच्चवर्णांत किंवा श्रीमंत घराण्यांत जन्म घेणें चांगलें किंवा वाईट असें मी म्हणत नाही. उच्च कुलांत, उच्च वर्णांत किंवा श्रीमंत घराण्यांत जन्मलेला मनुष्य जर प्राणघातादिक पापें करूं लागला, तर त्याची कुलीनता चांगली नव्हे. पण तो प्राणघातादिक पापांपासून विरत झाला तर त्याची कुलीनता वाईट नव्हे. ज्या माणसाची परिचर्या केली असतां, श्रद्धा, शील, श्रुत त्याग आणि प्रज्ञा यांची अभिवृद्धि होते, त्याची परिचर्या करावी असें मी म्हणतों.

एसु०—भो गोतम, ब्राह्मण हीं चार धनें प्रतिपादितात. भिक्षाचर्या ब्राह्मणाचें स्वकीय धन होय, बाणभाता हें क्षत्रियाचें, शेती आणि गोरक्षा हें वैश्याचें आणि कोयता व टोपली हें शूद्राचें. चारही वर्णांनी आपापल्या स्वकीय धनाची हेळसांड केली, तर ते चोरी करणाऱ्या राखणदाराप्रमाणें अकृत्यकारी होतात. यासंबंधीं आपलें म्हणणें काय आहे?

भ०—हे ब्राह्मणा, हीं चार धनें सांगण्याला ब्राह्मणांना लोकांनी अधिकार दिला आहे काय?

एसु०—नाही, भो गोतम.

भ०—तर मग मांस न खाऊं इच्छिणाऱ्या गरीब माणसावर मांसाचा वाटा लादून त्याची किंमत मागण्यासारखें हें ब्राह्मणांचें कृत्य समजलें पाहिजे. हे ब्राह्मणा, आर्य श्रेष्ठ धर्म हेंच सर्वांचें स्वकीय धन आहे, असें मी म्हणतों. क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य आणि शूद्र या चार कुळांत जन्मलेल्या माणसांना अनुक्रमें क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य, शूद्र म्हणतात. ज्याप्रमाणें लाकूड, शकलिका, गवत आणि गोवऱ्या या चार पदार्थांपासून उत्पन्न झालेल्या अग्नीला अनुक्रमें काष्ठाग्नि, शकलिकाग्नि, तृणाग्नि आणि गोमयाग्नि म्हणतात, त्याप्रमाणें ह्या चार संज्ञा आहेत. परंतु ह्या चारी कुलांतील मनुष्य प्राणघातादिक

पापांपासून निवृत्त झाले, तर त्यांपैकी ब्राह्मण तेवढाच मैत्रीभावना करूं शकेल, व इतरवर्णी लोक मैत्रीभावना करूं शकणार नाहीत, असें तुला वाटतें काय?

एसु०–भो गोतम, असें नव्हे. कोणत्याही वर्णाचा मनुष्य मैत्रीभावना करूं शकेल.

भ०–ब्राह्मणच तेवढा नदीवर जाऊन स्नानचूर्णाने आपलें अंग साफ करूं शकेल, पण इतर वर्णाचे लोक आपलें अंग साफ करूं शकणार नाहीत, असें तुला वाटतें काय?

एसु०–भो गोतम, असें नव्हे. चारही वर्णांचे लोक नदीवर जाऊन स्नानचूर्णाने आपलें अंग साफ करूं शकतील.

भ०–त्याचप्रमाणें, हे ब्राह्मणा, सर्व कुलांतील लोक तथागताच्या उपदेशाप्रमाणें वागून न्याय्य धर्माची आराधना करूं शकतील.

### ब्राह्मणवर्णच श्रेष्ठ हा नुसता आवाज

बुद्ध भगवंताच्या परिनिर्वाणानंतर देखील बुद्धाचे प्रमुख शिष्य चातुर्वर्ण्याला संमति देत नसत. हें चातुर्वर्ण्य कृत्रिम आहे, असें ते प्रतिपादीत. याचें एक चांगलें उदाहरण मज्झिमनिकायांतील (नं. ८४) मधुरसुत्तांत सापडतें. त्याचा सारांश असा—

एके समयीं आयुष्मान् महाकच्चान मधुरेजवळ* गुंदावनांत राहत होता. मधुरेच्या राजाने–अवंतिपुत्राने–महाकच्चानाची कीर्ति ऐकली. मोठ्या परिवारासह तो त्याजपाशीं गेला व कुशल-समाचारादिक विचारून एका बाजूला बसला आणि म्हणाला, "भो कात्यायन, ब्राह्मणवर्णच श्रेष्ठ आहे, इतर वर्ण हीन आहेत, ब्राह्मणवर्णच शुक्ल आहे, इतर वर्ण कृष्ण आहेत, ब्राह्मणांनाच

* हीच सध्यांची मथुरा.

मुक्ति मिळते, इतरांना मिळत नाही, ब्राह्मण ब्रह्मदेवाच्या मुखापासून झालेले, ब्रह्मदेवाचे औरस पुत्र आहेत, असें ब्राह्मण प्रतिपादितात. यासंबंधीं आपलें म्हणणें काय आहे ?

का०—हे महाराज, हा नुसता आवाज (घोष) आहे! समजा एखादा क्षत्रिय धनधान्याने किंवा राज्याने समृद्ध झाला, तर त्याची सेवा चारी वर्णांचे मनुष्य करतील की नाही ?

राजा—भो कात्यायन, चारी वर्णांचीं माणसें त्याची सेवा करतील.

का०—त्याचप्रमाणें इतर कोणत्याही वर्णाचा मनुष्य जर धनधान्याने व राज्याने समृद्ध झाला, तर त्याची सेवा चारही वर्णांचे लोक करतील किंवा नाही ?

राजा—चारी वर्णांचे लोक त्याची सेवा करतील.

का०—तर मग, चारी वर्णांचे मनुष्य समान ठरत नाहीत काय ?

राजा—या दृष्टीने चारही वर्ण खात्रीने समान ठरतात. त्यांत मला कोणताही भेद वाटत नाही.

का०—म्हणून मी म्हणतों की, ब्राह्मणच श्रेष्ठ वर्ण इत्यादि जें ब्राह्मणांचें म्हणणें आहे, तो केवळ आवाज होय. क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य आणि शूद्र या चारी वर्णांतील माणसांनी प्राणघातादिक पापें आचरिलीं, तर ते सारखेच दुर्गतीला जातील, असें महाराजाला वाटत नाही काय ?

राजा—चारही वर्णांपैकी कोणत्याही मनुष्याने पापकर्म केलें तर तो दुर्गतीला जाईल.

का०—ठीक, महाराज, असें जर आहे, तर चारही वर्ण समान ठरत नाहीत काय ? तुम्हांला यासंबंधीं काय वाटतें ?

राजा—या दृष्टीने चारही वर्ण खात्रीने समान ठरतात. त्यांच्यांत मला भेद दिसत नाही.

का०—चारही वर्णांपैकी कोणी मनुष्य प्राणघातादिक पापांपासून विरत झाला, तर तो स्वर्गाला जाईल की नाही?

राजा—तो स्वर्गाला जाईल असें मी समजतों.

का०—आणि म्हणूनच मी म्हणतों की, ब्राह्मण वर्णच श्रेष्ठ, हा नुसता आवाज आहे. हे महाराज, समजा, तुमच्या राज्यांत चारही वर्णांपैकी कोणत्याही माणसाने घरफोडी लुटालूट, परदारागमन, इत्यादिक अपराध केले, आणि त्याला राजपुरुषांनी आणून तुमच्या समोर उभें केलें, तर त्याला तुम्ही (त्याच्या जातीकडे न पाहतां) योग्य तो दंड कराल की नाही?

राजा—तो जर वधार्ह असला, तर त्याचा मी वध करीन; दंडनीय असला, तर त्याला मी दंड करीन; आणि हद्दपार करण्याला योग्य असला, तर त्याला हद्दपार करीन. कां की, क्षत्रियब्राह्मणादिक जी त्याची पूर्वीची संज्ञा होती, ती नष्ट झाली आणि तो गुन्हेगार आहे, असें ठरलें.

का०—तर मग हे चारही वर्ण समान नाहीत काय?

राजा—ह्या दृष्टीने पाहूं गेलें असतां चारही वर्ण समान ठरतात.

का०—समजा, ह्या चारही वर्णांपैकी कोणताही मनुष्य जर परिव्राजक झाला आणि सदाचार पाळूं लागला, तर तुम्ही त्याच्याशीं कसे वागाल?

राजा—त्याला आम्ही वंदन करूं, त्याचा योग्य मान ठेवूं, व त्याला अन्नवस्त्रादिक जरूरीचे पदार्थ देऊं. कां की, त्याची क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य, शूद्र इत्यादिक संज्ञा नष्ट होऊन तो श्रमण या संज्ञेनेच ओळखला जातो.

का०—तर मग हे चारही वर्ण समसमान ठरत नाहीत काय ?

राजा—या रीतीने हे चारही वर्ण खात्रीने समान ठरतात.

का०—म्हणून मी म्हणतों की, ब्राह्मण वर्णच श्रेष्ठ आहे, हा नुसता आवाज होय.

हा संवाद झाल्यावर अवंतिपुत्र राजा महाकात्यायनाला म्हणाला, "भो कात्यायन, आपला उपदेश फारच सुंदर आहे. जसें एखादें पालथें घातलेलें भांडें ऊर्ध्वमुख करून ठेवावें, झाकलेली वस्तु उघडी करावी, वाट चुकलेल्याला वाट दाखवावी, किंवा डोळसांना पदार्थ दिसावे म्हणून अंधारामध्ये मशाल पाजळावी, त्याप्रमाणें भवान् कात्यायनाने अनेक पर्यायांनी धर्मोपदेश केला. म्हणून मी भवान् कात्यायनाला, 'धर्माला आणि भिक्षुसंघाला शरण जातों. मी आजपासून आमरण शरण गेलेला उपासक आहें असें समजा."

का०—महाराज, मला शरण जाऊं नका. ज्या भगवंताला मी शरण गेलों, त्याला तुम्ही देखील शरण जा.

राजा—भो कात्यायन, तो भगवान् सध्या कोठे आहे ?

का०—तो भगवान् परिनिर्वाण पावला.

राजा—तो भगवान् हयात असता, तर आम्ही त्याच्या दर्शनासाठी शंभर योजनें देखील प्रवास केला असता. पण आता परिनिर्वाण पावलेल्या देखील त्या भगवंताला आम्ही शरण जातों, त्याचप्रमाणें त्याच्या धर्माला आणि भिक्षुसंघाला शरण जातों. आजपासून आमरण शरण गेलेला मी उपासक आहें असें समजा.

बुद्धाच्या हयातींत मथुरेंत बौद्ध धर्माचा फारसा प्रसार झाला नव्हता, हें दुसऱ्या प्रकरणांत दिलेल्या अंगुत्तरनिकायांतील सुत्तावरून दिसून येईलच. (पृ० ३८). अवंतिपुत्र राजा बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर गादीवर आला असावा. कां की, तो जर बुद्धाच्या हयातींत गादीवर

असता, तर त्याला बुद्धासंबंधाने थोडीबहुत माहिती असतीच. वरील सुत्ताच्या शेवटल्या मजकुरावरून दिसून येईल की, बुद्ध परिनिर्वाण पावला हें देखील त्याला माहीत नव्हतें. बुद्धाच्या हयातींत त्याचा बाप गादीवर होता व त्याला ब्राह्मणधर्माचें फार महत्त्व वाटत होतें आणि त्यामुळे बुद्धाकडे त्याने दुर्लक्ष केलें असावें. महाकात्यायन अवन्तीचा राहणारा, मूळचा ब्राह्मण आणि विद्वान असल्याकारणाने या तरुण अवंतिपुत्र राजावर त्याचा प्रभाव पडला असें समजणें योग्य आहे.

### श्रमणांना जातिभेद मोडतां आला नाही

वर दिलेल्या चार सुत्तांपैकी पहिल्या वासिष्ठसुत्तांत जातिभेद नैसर्गिक कसा नाही हें बुद्ध भगवंताने स्पष्ट करून दाखविलें आहे. दुसऱ्या अस्सलायनसुत्तांत ब्रह्मदेवाच्या मुखापासून ब्राह्मण झाले ही कल्पना खोडून काढली आहे. आणि तिसऱ्या एसुकारिसुत्तांत ब्राह्मणांना इतर वर्णांचीं कर्तव्याकर्तव्यें ठरविण्याचा अधिकार कसा पोचत नाही, हें सिद्ध केलें आहे. चौथ्या माधुरसुत्तांत महाकात्यायनाने आर्थिक आणि नैतिक दृष्ट्या जातिभेदाची कल्पना कशी निरर्थक ठरते, हें स्पष्ट केलें आहे. या सर्व सुत्तांचा नीट विचार केला असतां असें दिसून येतें की, बुद्धाला किंवा त्याच्या शिष्यांना जातिभेद मुळीच पसंत नव्हता, आणि तो मोडून टाकण्यासाठी त्यांनी बरीच खटपट केली. परंतु हें कृत्य त्यांच्या आवाक्याबाहेरचें होतें. ब्राह्मणांनी मध्यहिंदुस्थानांतच नव्हे, तर गोदावरीच्या तीरापर्यंत जातिभेदाची लागवड करून ठेवली होती. आणि तो सर्वस्वीं उपटून टाकणें कोणत्याही श्रमणसंघाला शक्य झालें नाही.

### श्रमणांत जातिभेद नव्हता

तथापि ऋषिमुनींच्या परंपरेला अनुसरून श्रमणांनी आपल्या संघांत जातिभेदाला थारा दिला नाही. कोणत्याही जातीच्या मनुष्याला

श्रमण होऊन एखाद्या 'श्रमण संघांत दाखल होतां येत असे. हरिकेशिबल चांडाळ असून निर्ग्रन्थांच्या (जैनांच्या) संघांत होता हें नवव्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. (पृ० ५३ पहा). बुद्धाच्या भिक्षुसंघांत तर श्वपाक नांवाचा चांडाळ आणि सुनीत नांवाचा भंगी यांच्यासारखे अस्पृश्य वर्गांत जन्मलेले मोठे साधु होऊन गेले.* आपल्या संघांत जे मोठे गुण आहेत त्यांपैकी जातिभेदाला थारा नाही हा एक होय, असें बुद्ध भगवंताचें म्हणणें आहे. भगवान् म्हणतो, "भिक्षुहो, गंगा, यमुना, अचिरवती, सरभू (शरयू), मही, या महानद्या महासमुद्राला मिळाल्या म्हणजे आपलीं नांवें टाकून महासमुद्र हें एकच नांव पावतात. त्याप्रमाणें क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य, शूद्र हे चार वर्ण तथागताच्या संघांत प्रवेश केल्यावर पूर्वीचीं नामगोत्रें टाकून 'शाक्यपुत्रीय श्रमण' या एकाच नामाभिधानानें ओळखले जातात." (उदान ५।५ व अंगुत्तरनिकाय, अट्ठकनिपात).

## अशोककालीं बौद्धसंघांत जातिभेद नव्हता

अशोकसमकालीन बौद्ध संघ जातिभेद मुळीच पाळीत नव्हता, असें दिव्यावदानांतील यश अमात्याच्या गोष्टीवरून दिसून येतें.

अशोक राजा नुकताच बौद्ध झाला होता व तो सर्व भिक्षूंच्या पायां पडे. तें पाहून यश नांवाचा त्याचा अमात्य म्हणाला, "महाराज, या शाक्य श्रमणांत सर्व जातीचे लोक आहेत, त्यांपुढे आपलें अभिषिक्त डोकें नमवणें योग्य नव्हे."

अशोकाने कांही उत्तर दिलें नाही आणि कांही काळाने बकरे, मेंढे वगैरे प्राण्यांचीं डोकीं मागवून तीं विकावयास लावलीं; यशाला मनुष्याचें डोकें आणावयास लावून तें विकावयास लावलें.

---

* बौद्धसंघाचा परिचय, पृ० २५३-५६ पहा.

बकरे मेंढे वगैरे प्राण्यांच्या डोक्यांची कांही किंमत आली; पण माणसाचें डोकें कोणी घेईना. तेव्हा अशोकाने तें कोणाला तरी फुकट द्यावें असें फर्मावलें. परंतु तें फुकट घेणारा मनुष्य यश अमात्याला आढळला नाही. ही गोष्ट त्याने अशोकाला निवेदिली. तेव्हा अशोक म्हणाला, "हें मनुष्याचें डोकें फुकट दिलें तरी लोक कां घेत नाहीत?"

यश–कारण ते ह्या डोक्याचा कंटाळा करतात.

अ०–याच माणसाच्या डोक्याचा ते कंटाळा करतात, की सर्वच माणसांच्या डोक्याचा ते कंटाळा करतील?

यश–महाराज, कोणत्याही माणसाचें डोकें कापून लोकांजवळ नेलें, तरी ते असाच कंटाळा करतील.

अ०–माझ्या डोक्याचा देखील कंटाळा करतील काय?

या प्रश्नाचें उत्तर देण्यास यश धजेना. पण अशोकाने अभयदान दिल्यावर तो म्हणाला, "महाराज आपल्या डोक्यालाही लोक असेच कंटाळतील."

अ०–तर मग मीं असें डोकें भिक्षूंच्या पायांवर ठेवून त्यांचा बहुमान केला, तर तुला वाईट कां वाटावें?

या संवादानंतर कांही श्लोक आहेत त्यांपैकी हा एक—

आवाहकालेऽथ विवाहकाले
जातेः परीक्षा न तु धर्मकाले।
धर्मक्रियाया हि गुणा निमित्ता
गुणाश्च जातिं न विचारयन्ति॥

'मुलाच्या आणि मुलीच्या लग्नांत* जातीचा विचार करणें योग्य आहे. धार्मिक बाबतींत जातीचा विचार करण्याचें कारण

* आवाह म्हणजे सुनेला घरीं आणणें आणि विवाह म्हणजे आपल्या मुलीचें लग्न करून सासरीं पाठविणें.

नाही. कां की, धार्मिक कृत्यांत गुण पाहावे लागतात; आणि गुण जातीवर अवलंबून नसतात.'

## जैन संघाने जातिभेद स्वीकारला

इतर श्रमणसंघांपैकी एक तेवढ्या निर्ग्रन्थ संघाची अल्पस्वल्प माहिती आजला उपलब्ध आहे. ह्या श्रमणसंघाने जातिभेदाला अशोकापूर्वीच महत्त्व देण्याला सुरवात केली, असें आचारांगसूत्राच्या निरुक्तीवरून दिसून येतें. ही निरुक्ति भद्रबाहूने रचली आणि तो चंद्रगुप्ताचा गुरु होता अशी समजूत जैन लोकांत प्रचलित आहे. ह्या निरुक्तीच्या आरंभींच जातिभेदाविषयी जो मजकूर सापडतो, त्याचा सारांश असा—'चार वर्णांच्या संयोगाने सोळा वर्ण उत्पन्न झाले. ब्राह्मण पुरुष आणि क्षत्रिय स्त्री यांजपासून प्रधान क्षत्रिय किंवा संकर क्षत्रिय उत्पन्न होतो. क्षत्रिय पुरुष आणि वैश्य स्त्री यांजपासून प्रधान वैश्य किंवा संकर वैश्य उत्पन्न होतो. वैश्य पुरुष व शूद्र स्त्री यांजपासून प्रधान शूद्र किंवा संकर शूद्र उत्पन्न होतो. ह्याप्रमाणें सात वर्ण होतात. आता हीं नववर्णान्तरें– (१) ब्राह्मण पुरुष व वैश्य स्त्री यांजपासून अम्बष्ठ; (२) क्षत्रिय पुरुष आणि शूद्र स्त्री यांजपासून उग्र; (३) ब्राह्मण पुरुष आणि शूद्र स्त्री यांजपासून निषाद; (४) शूद्र पुरुष आणि वैश्य स्त्री यांजपासून अयोगव; (५) वैश्य पुरुष आणि क्षत्रिय स्त्री यांजपासून मागध; (६) क्षत्रिय पुरुष व ब्राह्मण स्त्री यांजपासून सूत; (७) शूद्र पुरुष आणि क्षत्रिय स्त्री यांजपासून क्षत्ता; (८) वैश्य पुरुष आणि ब्राह्मण स्त्री यांजपासून वैदेह; (९) शूद्र पुरुष आणि ब्राह्मण स्त्री यांजपासून चांडाल उत्पन्न होतो.'

(आचारांग निर्युक्ति अ० १, गाथा २१ ते २७)

आजला अस्तित्वांत असलेली मनुस्मृति ह्या निर्युक्तीपेक्षा फारच अर्वाचीन आहे. तथापि ह्या निर्युक्तिसमकालीं ब्राह्मण लोक

मनुस्मृतींतील अनुलोम प्रतिलोम जातींची अशाच प्रकारें व्युत्पत्ति लावण्याचा प्रयत्न करीत होते, असें अनुमान करण्यास मुळीच हरकत नाही. आणि जैनांनी ही व्युत्पत्ति ब्राह्मणांकडूनच घेतली असावी, अशी बळकट शंका येते. कांही असो, निर्ग्रन्थ श्रमणांनी जातिभेदाला पूर्ण संमति दिल्याचा हा एक उत्तम दाखला आहे.

**हीनजातीयांना जैन साधुसंघांत घेण्याची मनाई**

बाले वुड्ढे नपुंसे य कीवे जड्डे य वाहिए ।
तेणे रायावगारी य उम्मत्ते य अदंसणे ॥
दासे दुट्ठे य मूढे य अणत्ते जुंगिए इ य ।
उबद्धए च भयए सेहनिप्फेडिया इ य ॥

(१) बाल, (२) वृद्ध, (३) नपुंसक, (४) क्लीब, (५) जड, (६) व्याधित, (७) चोर, (८) राजापराधी, (९) उन्मत्त, (१०) अदर्शन (?), (११) दास, (१२) दुष्ट, (१३) मूढ, (१४) ऋणार्त, (१५) जुंगित, (१६) कैदी, (१७) भयार्त, आणि (१८) पळवून आणलेला शिष्य, या अठरांना जैन साधुसंघांत घेण्याची मनाई आहे. यांच्यापैकी बऱ्याच व्यक्तींना बौद्ध भिक्षुसंघांत देखील घेतां येत नाही. ह्या दोन संघांतील प्रवेशविधींची (उपसंपदांची) तुलना अत्यंत उपयुक्त होईल.* पण तो या प्रकरणाचा विषय नव्हे. वर दिलेल्या अठरा असामींपकी पंधराव्याचा तेवढा विचार आवश्यक आहे. त्या शब्दावरची टीका अशी—

"तथा जाति–कर्म–शरीरादिभिर्दूषितो जुंगितः । तत्र मातंग–कोलिक–बरुड–सूचिक–छिंपादयोऽस्पृश्या जातिजुंगिताः । स्पृश्या अपि स्त्री–मयूर–कुक्कुट–शुकादिपोषका वंशवरत्रारोहण–नखप्रक्षा-

---

* बौद्ध भिक्षुसंघांतील प्रवेशविधीसंबंधीं 'बुद्ध, धर्म आणि संघ,' पृ० ५६–६० 'बौद्धसंघाचा परिचय,' पृ० १७–१९ पहा.

लन–सौकरिकत्व–वागुरिकत्वादिर्निंदितकर्मकारिणः कर्मजुंगिताः। करचरणवर्जिताः पंगु-कुब्ज-वामनक–काणप्रभृतयः शरीरजुंगिताः। तेऽपि न दीक्षार्हा लोकेऽवर्णवादसंभवात्।"

'त्याचप्रमाणें जाति, कर्म, शरीर इत्यादिकांनी दूषित जुंगित समजावा. त्यांत मांग, कोळी, बुरूड, शिंपी, रंगारी इत्यादिक अस्पृश्य जातिजुंगित होत. स्पृश्य असून देखील स्त्री, मोर, कोंबडीं, पोपट वगैरे पाळणें, बांबूवरची व दोरीवरची कसरत करणें, नखें साफ करणें, डुकरें पाळणें, पारध्याचें काम करणें, इत्यादि निंद्य कर्मे करणारे कर्मजुंगित होत. हातपाय नसलेले, पंगु, कुबडे, ठेंगणे, तिरवे इत्यादिक शरीरजुंगित होत. लोकांत टीका होण्याचा संभव असल्यामुळे ते देखील दीक्षा देण्यास योग्य नाहीत.'*

बौद्ध भिक्षुसंघांत प्रवेश करण्याला जाति मुळीच आड येत नाही. कर्में निंद्य असलीं, तर तीं त्याला सोडावींच लागतात, पण त्यांमुळे तो दीक्षेला अयोग्य ठरत नाही.

## अहिंदूंचा हिंदुसमाजांत प्रवेश

असें जरी आहे, तरी बौद्ध आणि जैन या दोनही संप्रदायांनी परकीय लोकांना हिंदुसमाजांत दाखल करून घेण्याचें महत्त्वाचें कार्य केलें. ग्रीक, शक, हूण, मालव, गुर्जर इत्यादिक बाहेरच्या जाती हिंदुस्थानांत आल्या, आणि या दोन धर्मांच्या महाद्वारांनी त्यांनी हिंदुसमाजांत प्रवेश केला. प्रथमतः हे लोक जैन किंवा बौद्ध होत असत, आणि मग यथारुचि ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य बनत. एकाच घराण्यांतील एका भावाच्या संततीने क्षत्रियत्व व दुसऱ्या भावाच्या

---

* प्रवचनसारोद्धार, द्वार १०७. हा उतारा मुनि श्री जिनविजयजी यांनी काढून दिला, ह्याबद्दल त्यांचे आभार मानतों.

संततीने ब्राह्मणत्व पत्करल्याचा दाखला सापडला आहे.*

## अस्पृश्यतेचा परिणाम

याप्रमाणें जेते लोक हिंदुसमाजांत मिसळून गेले, तरी अस्पृश्यांची परिस्थिति सुधारली नाही. जैन आणि बौद्ध श्रमणांनी त्यांची हेळसांड केली, आणि त्यामुळे उत्तरोत्तर अस्पृश्यांविषयी तिटकारा वाढत गेला; नाहक त्यांचा छळ होऊं लागला; आणि त्याचा परिणाम हळूहळू सर्व समाजाला व खुद्द जैनांना आणि बौद्धांना भोगावा लागला.

जातिभेद दृढ होत गेल्यावर जैन आणि बौद्ध सर्व जातींची भिक्षा स्वीकारतात म्हणून निंद्य ठरावयाला लागले. जैन संघांत अस्पृश्याला घेण्याची मनाई होती, तरी शूद्राला घेत असत असें वाटतें. बौद्ध संघांत तर शेवटपर्यंत जातिभेदाला थारा नव्हता. पण समाजांत जातिभेद बळावला, आणि ब्राह्मणांना शंबूकाच्या गोष्टी-सारख्या गोष्टी रचून लोकप्रिय पुराणांत दाखल करणें शक्य झालें. होतां होतां बौद्ध श्रमण निखालस नष्ट झाले, व जैन श्रमण जेमतेम कसेबसे जीव बचावून राहिले! त्यांच्या हातून समाजसंशोधनाचें कोणतेंही महत्कार्य घडून आलें नाही.

## भिक्षु संघाची अन्य देशांतील कामगिरी

जातिभेदासमोर बौद्ध भिक्षुसंघ हिंदुस्थानांत टिकाव धरून राहूं शकला नाही. तथापि बाहेरच्या देशांत त्याने मोठीच कामगिरी

---

* ह्यासंबंधीं Dr. D. R. Bhandarkar यांचा Indian Antiquary, Vol. 40, January 1911, PP. 7–37 मध्ये प्रसिद्ध झालेला The Foreign Elements in the Indian Population हा लेख पहावा. विशेषतः पृ० ३५–३६ वरील मजकूर अवश्य वाचावा.

बजावली आहे. दक्षिणेला सिंहलद्वीप, पूर्वेला ब्रह्मदेशापासून तहत जपानपर्यंत, आणि उत्तरेला तिबेट, मंगोलिया वगैरे देश या सर्व ठिकाणीं बौद्ध संघाने बहुजनसमाजाला एका कालीं सुसंस्कृत करून सोडलें. उत्तरेला हिमालयावरून आणि दक्षिणेला व पूर्वेला समुद्रांतून प्रवास करून अनेक भिक्षूंनी बौद्ध संस्कृतीची पताका या सर्व देशांवर फडकत ठेवली. याचें बीज वर दिलेल्या बुद्धाच्या उपदेशांत आहे. बुद्धाने जातिभेदाला यत्किंचित् थारा दिला असता, तर त्याच्या अनुयायी भिक्षूंनी म्लेच्छ समजल्या जाणाऱ्या देशांत संचार करून बौद्ध धर्माचा प्रसार केला नसता. जातिभेदामुळे आमची हानि झाली, पण पूर्व आशिया खंडाचा फायदा झाला, असें म्हणावें लागतें!

---

प्रकरण अकरावें

# मांसाहार

## बुद्ध भगवन्ताचा मांसाहार

परिनिर्वाणाच्या दिवशीं बुद्ध भगवन्ताने चुन्द लोहाराच्या घरीं डुकराचें मांस खाल्लें, आणि आजकालचे बौद्ध भिक्षु देखील कमी जास्ती प्रमाणाने मांसाहार करतात; तेव्हा असा प्रश्न उपस्थित होतो की, अहिंसेला परमधर्म समजणाऱ्या बुद्धाचें आणि त्याच्या अनुयायांचें हें वर्तन क्षम्य आहे काय? या प्रश्नाची चर्चा करणें योग्य वाटतें.

बुद्धाने परिनिर्वाणाच्या दिवशीं जो पदार्थ खाल्ला त्याचें नांव 'सूकरमद्दव' होतें. त्याच्यावर बुद्धघोषाचार्यांची टीका आहे ती अशी—

"सूकरमद्दवं ति नातितरुणस्स नातिजिण्णस्स एक जेट्ठकसूकरस्स पवत्तमंसं। तं किर मुदुं चेव सिनिद्धं च होति। तं पटियादापेत्वा साधुकं पचापेत्वा ति अत्थो। एके भणन्ति, सूकरमद्दवं ति पन मुदुओदनस्स पञ्चगोरसयूसपाचनविधानस्स नाममेतं, यथा गवपानं नाम पाकनामं ति। केचि भणन्ति सूकरमद्दवं नाम रसायनविधि, तं पन रसायनत्थे आगच्छति, तं चुन्देन भगवतो परिनिब्बानं न भवेय्या ति रसायनं पटियत्तं ति।"

'सूकरमद्दव म्हणजे फार तरुण नव्हे व फार वृद्ध नव्हे, पण जो अगदी लहान पोराहून वयाने मोठा अशा डुकराचें शिजविलेलें मांस. तें मृदु आणि स्निग्ध असतें. तें तयार करवून म्हणजे उत्तम रीतीने शिजवून असा अर्थ समजावा. कित्येक म्हणतात, पंचगोरसाने तयार केलेल्या मृदु अन्नाचें हें नांव आहे, जसें गवपान हें एका विशिष्ट पक्वान्नाचें नांव. कोणी म्हणतात, सूकरमद्दव नांवाचें एक रसायन होतें. रसायनार्थीं त्या शब्दाचा उपयोग करण्यांत येतो. भगवन्ताचें परिनिर्वाण होऊं नये, एतदर्थ तें चुन्दाने भगवंताला दिलें.'

या टीकेंत सूकरमद्दव शब्दाचा मुख्य अर्थ सूकरमांस असाच करण्यांत आला आहे. तथापि तो अर्थ बरोबर होता, याजबद्दल बुद्धघोषाचार्याला खात्री नव्हती. कां की, त्याच वेळीं ह्या शब्दाचे आणखी दोन अर्थ करण्यांत येत असत. याशिवाय दोन भिन्न अर्थ उदानअट्ठकथेंत सापडतात, ते असे—

"केचि पन सूकरमद्दवं ति न सूकरमंसं, सूकरेहि मद्दितवंसकळीरो ति वदन्ति। अञ्ञे सूकरेहि मद्दितपदेसे जातं अहिच्छत्तकं ति।"

'कोणी म्हणतात, सूकरमद्दव म्हणजे डुकराचें मांस नव्हे. डुकरांनी तुडवलेल्या वेळूचा तो मोड. दुसरे म्हणतात, डुकरांनीं तुडवलेल्या जागीं उगवलेलें अळंबें.'

याप्रमाणे सूकरमद्दव शब्दाच्या अर्थासंबंधाने पुष्कळच मतभेद आहेत. तथापि बुद्ध भगवान सूकरमांस खात होता, याला अंगुत्तरनिकायाच्या पंचकनिपातांत आधार सापडतो. उग्ग गहपति म्हणतो—

"मनापं मे भन्ते संपन्नवरसूकरमंसं, तं मे भगवा पटिग्गण्हातु अनुकम्पं उपादाया ति। पटिग्गहेसि भगवा अनुकम्पं उपादाया ति।"

'भदन्त, उत्तम डुकराचें उत्कृष्ट रीतीने शिजवून तयार केलेलें हें मांस आहे, तें माझ्यावर कृपा करून भगवन्ताने घ्यावें. भगवंताने कृपा करून तें मांस घेतलें.'

## जैन श्रमणांचा मांसाहार

इतर श्रमणसंप्रदायांत जे अत्यन्त तपस्वी होते त्यांत प्रामुख्याने जैनांची गणना होत असे. असें असतां जैनसंप्रदायांतील श्रमण मांसाहार करीत होते, असें आचारांग सूत्रांतील खालील उताऱ्यावरून दिसून येईल—

"से भिक्खू वा भिक्खुणी वा सेज्जं पुण जाणेज्जा बहुअट्ठियं मंसं वा, मच्छं वा बहुकंटकं, अस्सिं खलु पडिगाहितंसि अप्पे सिया भोयणजाए बहुउज्झियधम्मिए। तहप्पगारं बहुअट्ठियं वा मंसं, मच्छं वा बहुकंटकं, लाभेवि संते णो पडिगाहेज्जा। से भिक्खू वा भिक्खुणी वा गाहावइकुलं पिंडवायपडियाए अणुपविट्ठ समाणे परो बहुअट्ठिएण मंसेण मच्छेण उवणिमंतेज्जा, आउसंतो समणा अभिकंखसि बहुअट्ठियं मंसं पडिगाहेत्तए? एयप्पगारं णिग्घोसं सोच्चा णिसम्म से पुव्वमेव आलोएज्जा, आउसोत्ति वा भइणीत्ति वा णो खलु मे कप्पइ बहुअट्ठियं मंसं पडिगाहेत्तए, अभिकंखसि से दाउं जावइयं तावइयं पोग्गलं दलयाहि मा अट्ठियाइं। से सेवं वदंतस्स परो अभिहट्टु

अंतोपडिग्गहगंसि बहुअट्ठियं मंसं परिभाएत्ता णिहट्टु दलएज्जा, तहप्पगारं पडिग्गहणं परहत्थंसि वा परपायंसि वा अफासुयं अणेसणिज्जं लाभे वि संते णो पडिगाहेज्जा। से आहच्च पडिगाहिए सिया तं णोहित्ति वएज्जा, अणोवत्ति वएज्जा। से त्तमायाय एगंतमवक्कमेज्जा। अवक्कमेत्ता अहेआरामंसि वा अहेउवस्सयंसि वा अप्पंडए जाव संताणए मंसगं मच्छगं भोच्चा अट्ठियाइं कंटए गहाय से त्तमायाए एगंतमवक्कमेज्जा। अवक्कमेत्ता अहेज्झामथंडिलंसि वा अट्ठिरासिंसि वा किट्टरासिंसि वा तुसरासिंसि वा गोमयरासिंसि वा अण्णयरंसि वा तहप्पगारंसि थंडिलंसि पडिलेहिय पडिलेहिय पमज्जिय पमज्जिय तओ संजयामेव पमज्जिय पमज्जिय परिट्ठवेज्जा।"

'पुनरपि तो भिक्षु किंवा ती भिक्षुणी फार हाडें असलेलें मांस किंवा पुष्कळ काटे असलेला मासा मिळाला तर जाणील की, यांत खाण्याचा पदार्थ कमी व टाकण्याचा जास्त आहे. अशा प्रकारचें पुष्कळ हाडें असलेलें मांस किंवा पुष्कळ काटे असलेला मासा मिळाला तर तो त्याने घेऊं नये. तो भिक्षु किंवा ती भिक्षुणी गृहस्थाच्या घरीं भिक्षेसाठी गेला किंवा गेली असतां गृहस्थ म्हणेल, आयुष्मान् श्रमणा, हें पुष्कळ हाडें असलेलें मांस घेण्याची तुझी इच्छा आहे काय? अशा प्रकारचें भाषण ऐकून पूर्वीच त्याने म्हणावें, आयुष्मान्, किंवा (बाई असेल तर) भगिनी, हें फार हाडें असलेलें मांस घेणें मला योग्य नाही. जर तुझी इच्छा असेल, तर फक्त मांस तेवढें दे, हाडें देऊं नकोस. असें म्हणत असतांही जर तो गृहस्थ आग्रहाने देण्यास प्रवृत्त झाला, तर तें अयोग्य समजून घेऊं नये. त्याने तें पात्रांत टाकलें, तर तें एका बाजूला घेऊन जावें आणि आरामांत किंवा उपाश्रयांत प्राण्यांचीं अंडीं तुरळक असतील अशा ठिकाणीं बसून मांस आणि मासा तेवढा खाऊन हाडें व काटे घेऊन एका बाजूला जावें. तेथे जाऊन भाजलेल्या जमिनीवर, हाडांच्या

राशीवर, गंजलेल्या लोखंडाच्या जुन्या तुकडयांच्या राशीवर, तुसाच्या राशीवर, वाळलेल्या शेणाच्या राशीवर किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या स्थंडिलावर (उंचवटयावर) जागा चांगल्या रीतीने साफसूफ करून तीं हाडें किंवा ते काटे संयमपूर्वक त्या ठिकाणीं ठेवून द्यावे.'

याचाच अनुवाद दशवैशालिक सूत्रांतील खालील गाथांत संक्षेपाने केला आहे—

बहु अट्ठियं पुग्गलं अणिमिसं वा बहुकंटयं ।
अच्छियं तिंदुयं बिल्लं, उच्छुखण्डं व सिंबलिं ॥
अप्पे सिआ भोअणज्जाए, बहुउज्झिय धम्मियं ।
दिंतिअं पडिआइक्खे न मे कप्पई तारिसं ॥

'पुष्कळ हाडें असलेलें मांस, पुष्कळ काटे असलेला मासा, अस्थिवृक्षाचें फळ, बेलफळ, ऊस, शाल्मलि अशा प्रकारचे पदार्थ– ज्यांत खाण्याचा भाग कमी व टाकण्याचा जास्त–देणारीला, ते मला योग्य नाहीत, असें म्हणून प्रतिबंध करावा.'

### मांसाहाराविषयीं प्रसिद्ध जैनसाधूंचें मत

गुजरात विद्यापीठाची पुरातत्त्वमंदिर नांवाची शाखा होती, तिच्या तर्फे 'पुरातत्त्व' त्रैमासिक निघत असे. या त्रैमासिकाच्या १९२५ सालच्या एका अंकांत मी प्रस्तुत प्रकरणाच्या धर्तीवर एक लेख लिहिला आणि त्यांत हे दोन उतारे देण्यांत आले. मी त्यांचा स्वत: शोध लावला होता असें नव्हे. मांसाहाराविषयीं चर्चा चालली असतां प्रसिद्ध जैन पण्डितांनीच ते माझ्या निदर्शनास आणले आणि त्यांचा मी माझ्या लेखांत उपयोग केला.

हा लेख प्रसिद्ध झाल्यावर अमदाबादच्या जैन लोकांत फारच खळबळ उडाली. त्यांच्या धर्माचा मी उच्छेद करूं पाहतों, अशा

अर्थाच्या त्यांच्या तक्रारी पुरातत्त्वमंदिराच्या संचालकांकडे येऊन थडकल्या. संचालकांनी परस्पर त्या तक्रारींचा परिहार केला. मला त्यांची बाधा झाली नाही.

त्या वेळीं वयोवृद्ध स्थानकवासी साधु गुलाबचंद व त्यांचे प्रसिद्ध शतावधानी शिष्य रतनचंद अहमदाबादेला राहत असत. एका जैन पंडिताबरोबर मी त्यांच्या दर्शनाला गेलों. संध्यासमय होता व जैन साधु आपणाजवळ दिवा ठेवीत नसल्यामुळे ह्या दोन साधूंचे चेहरे स्पष्ट दिसत नव्हते. माझ्याबरोबरच्या जैन पंडिताने रतनचंद स्वामींना माझी ओळख करून दिली, तेव्हा ते म्हणाले, "तुमची कीर्ति मी ऐकत आहें. परंतु तुम्ही आमचे प्राचीन साधु मांसाहार करीत होते, असें लिहून आमच्या धर्मावर आघात केलात, हें ठीक नव्हे."

मी म्हणालों, "बौद्ध आणि जैन हे दोनच श्रमण संप्रदाय आजला अस्तित्वांत राहिले आहेत. आणि त्यांजविषयीं माझें प्रेम किती आहे, हें या (माझ्याबरोबर असलेल्या) पंडितांनाच विचारा. परंतु संशोधनाच्या बाबतींत श्रद्धा, भक्ति किंवा प्रेम आड येऊं देतां कामा नये. सत्यकथनाने कोणत्याही संप्रदायाचें नुकसान होईल, असें मला वाटत नाही. आणि सत्यार्थ प्रकाशित करणें संशोधकांचें कर्तव्य आहे, असें मी समजतों."

वृद्ध गुलाबचंद साधु कांही अंतरावर बसले होते ते तेथूनच आपल्या शिष्याला म्हणाले, "या गृहस्थाने दोन उताऱ्यांचा जो अर्थ लावला, तोच बरोबर आहे; आधुनिक टीकाकारांनी केलेले अर्थ ठीक नव्हत. ह्या दोन उताऱ्यांशिवाय आणखी बऱ्याच ठिकाणीं, जैन साधु मांसाहार करीत होते, याला आधार सापडतात."

असें म्हणून त्यांनी जैन सूत्रांतील उतारे म्हणण्यास सुरवात केली. पण त्यांच्या विद्वान शिष्यांनी विषयांतर करून हा संवाद

तसाच सोडून दिला. त्यांच्या गुरूंनी सांगितलेले आधार कोणते, हें मी विचारलें नाही. तसें करणें मला अप्रस्तुत वाटलें.

### महावीरस्वामींच्या मांसाहाराबद्दल वाद

खुद्द महावीरस्वामी मांसाहार करीत होते यासंबंधीं सबळ पुरावा सध्या पुढे आला आहे. 'प्रस्थान' मासिकाच्या गेल्या कार्तिकाच्या अंकांत (संवत् १९९५ वर्ष १४ अंक १) श्रीयुत गोपाळदास जीवाभाई पटेल यांनी 'श्री महावीरस्वामीनो मांसाहार' नांवाचा लेख प्रसिद्ध केला आहे. त्यापैकी प्रस्तुत विषयाला लागू पडणारी माहिती संक्षेपाने येथे देतों.

महावीरस्वामी श्रावस्ती नगरींत राहत होते. मक्खलि गोसाल देखील तेथे पोचला. आणि ते दोघे परस्परांच्या जिनत्वाविरुद्ध कडक टीका करूं लागले. परिणामीं गोसालाने महावीरस्वामीला शाप दिला की, माझ्या तपोबलाने तूं सहा महिन्यांच्या अन्तीं पित्तज्वराने मरण पावशील. महावीरस्वामीने त्याला उलटा शाप दिला की, तूं सातव्या रात्रीं पित्तज्वराने पीडित होऊन मरण पावशील. त्याप्रमाणे गोसाल सातव्या रात्रीं मरण पावला. पण त्याच्या प्रभावाने महावीर स्वामीला अत्यंत दाह होऊन रक्ताचे झाडे सुरू झाले.

त्या वेळीं महावीरस्वामीने सिंह नांवाच्या आपल्या शिष्याला सांगितलें, "तूं मेंढिक गावांत रेवती नांवाच्या बाईपाशीं जा. तिने माझ्यासाठी दोन कबुतरें शिजवून ठेवलीं आहेत, तीं मला नकोत. 'काल मांजराने मारलेल्या कोंबडीचें मांस तूं तयार केलें आहेस, तेवढें दे,' असें तिला सांग."

श्रीयुत गोपाळदास यांनी, मूळ भगवती सूत्रांतील उतारा आपल्या लेखांत दिला नाही. तो येथे देणें योग्य आहे.—

"तं गच्छह णं तुमं सीहा, मेंढियगामं नगरं रेवतीए गाहावतिणीए गिहे तत्थ णं रेवतीए गाहावतिणीए ममं अट्ठाए दुवे कबोयसरीरा

उवक्खडिया, तेहिं नो अट्ठो। अत्थि से अन्ने पारियासिए मज्जारकडए कुक्कुडमंसए तं आहराहि एएणं अट्ठो।"

ज्याला अर्धमागधीचें अल्पस्वल्प ज्ञान आहे, त्याने निःपक्षपातीपणाने हा उतारा वाचला, तर तो म्हणेल की, श्री. गोपाळदास यांनी केलेला अर्थ बरोबर आहे. पण आजला* श्री. गोपाळदास यांच्या विरुद्ध अनेक जैन पंडितांनी कडक टीका चालविली आहे!

**बौद्ध आणि जैन श्रमणांच्या मांसाहारांत फरक**

मांसाहारासंबंधाने जैनांचा आणि बौद्धांचा वाद कशा प्रकारचा होता, याचा विचार केला असतांही श्री. गोपाळदास यांचेंच म्हणणें बरोबर आहे असें ठरतें.

वैशालींतील सिंह सेनापति निर्ग्रन्थांचा उपासक होता, याचा उल्लेख आठव्या प्रकरणांत आलाच आहे (पृ. ३२). बुद्धाचा उपदेश ऐकून तो बुद्धोपासक झाला व त्याने बुद्धाला आणि भिक्षुसंघाला आपल्या घरीं आमंत्रण देऊन आदरपूर्वक त्यांचें संतर्पण केलें. पण निर्ग्रन्थांना ही गोष्ट रुचली नाही. त्यांनी वैशाली नगरींत अशी वदंता उठविली की, सिंहाने मोठा पशु मारून गोतमाला आणि भिक्षुसंघाला मेजवानी दिली आणि गोतमाला हें माहीत असतां, सिंहाने दिलेल्या भोजनाचा त्याने स्वीकार केला! ही बातमी एका गृहस्थाने येऊन हळूच सिंहाला सांगितली, तेव्हा तो म्हणाला, "यांत कांही अर्थ नाही. बुद्धाची नालस्ती करण्यांत निर्ग्रन्थांना आनंद वाटतो. पण मी जाणून बुजून मेजवानीसाठी प्राण्याची हिंसा करीन हें अगदीच असंभवनीय आहे."

---

* म्हणजे १९३८ सालीं.

† बुद्धलीलासारसंग्रह, पृ. २७९–२८१ पहा.

अशाच तऱ्हेचा दुसरा एक उतारा मज्झिमनिकायांतील (५५ व्या) जीवक सुत्तांत सापडतो तो असा—

एके समयीं भगवान राजगृह येथे जीवक कौमारभृत्याच्या आम्रवनांत राहत होता. तेव्हा जीवक कौमारभृत्य भगवंताजवळ आला, भगवंताला अभिवादन करून एका बाजूला बसला आणि म्हणाला, "भदन्त, आपणाला उद्देशून प्राणी मारून तयार केलेलें अन्न आपण खात असतां, असा आपणावर आरोप आहे, तो खरा आहे काय?" भगवान् म्हणाला, "हा आरोप साफ खोटा आहे. आपल्यासाठी प्राणिवध केलेला आपण पाहिला, ऐकला किंवा तशी आपणांस शंका आली, तर तें अन्न निषिद्ध आहे, असें मी म्हणतों."

यावरून जैनांचा बुद्धावर आरोप कशा प्रकारचा होता हें समजून येतें. बुद्ध भगवंताला कोणी आमंत्रण करून मांसाहार दिला असतां जैन म्हणत, श्रमण गोतमाकरितां पशु मारून तयार केलेलें (उद्दिस्सकटं) मांस तो खातो! स्वतः जैन साधु कोणाचें आमंत्रण स्वीकारीतच नसत. रस्त्यांतून जात असतांना मिळालेली भिक्षा घेत आणि त्या प्रसंगीं मिळालेलें मांस खात.

## कांहीं तपस्वी मांसाहार वर्ज्य करीत

बुद्धसमकालीन कांहीं तपस्वी लोक मांसाहार निषिद्ध समजत. त्यांपैकी एका तपस्व्याचा आणि काश्यप बुद्धाचा संवाद सुत्तनिपातांतील (१४ व्या) आमगंध सुत्तांत सापडतो. त्या सुत्ताचें भाषांतर असें*—

---

* ह्या आमगंध सुत्तांतील उपदेशाची तुलना ख्रिस्ताच्या खाली दिलेल्या वचनाशी करावी. "जें तोंडांत जातें, तें माणसाला विटाळवीत नाही; पण जें तोंडांतून निघतें, तें विटाळवितें." (म्याथ्यू १५।११).

१. (तिष्य तापस–) श्यामक, चिंगूलक, चीनक, झाडांचीं पानें, कंदमूळ आणि फळें धर्मानुसार मिळालीं असतां त्यांजवर निर्वाह करणारे चैनीच्या पदार्थांसाठी खोटें बोलत नसतात.

२. हे काश्यपा, परक्यांनी दिलेलें निवडक व चांगल्या रीतीने शिजविलेल्या तांदळांचें सुरस व उत्तम अन्न स्वीकारणारा तूं आमगंध (अमेध्य पदार्थ) खातोस!

३. हे ब्रह्मबंधु, पक्ष्याच्या मांसाने मिश्रित तांदळांचें अन्न खात असतां तूं आपणाला आमगंध योग्य नाही, असें म्हणतोस! तेव्हा हे काश्यपा, मी तुला विचारतों की, तुझा आमगंध कशा प्रकारचा?

४. (काश्यप बुद्ध–) प्राणघात, वध, छेद, बंधन, चोरी, खोटें भाषण, ठकवणें, नाडणें, जारणमारणादिकांचा अभ्यास आणि व्यभिचार, हा आमगंध होय; मांसभोजन हा नव्हे.

५. ज्यांना स्त्रियांच्या बाबतींत संयम नाही, जे जिव्हालोलुप, अशुचिकर्ममिश्रित, नास्तिक, विषम आणि दुर्विनीत त्यांचें कर्म हा आमगंध होय; मांसभोजन हा नव्हे.

६. जे रूक्ष, दारुण, चहाडखोर, मित्रद्रोही, निर्दय, अतिमानी, कृपण, कोणाला कांहीही देत नाहीत, त्यांचें कर्म हा आमगंध होय; मांसभोजन हा नव्हे.

७. क्रोध, मद, कठोरता, विरोध, माया, ईर्ष्या, वृथा बडबड, मानातिमान आणि खळांची संगति हा आमगंध होय; मांसभोजन हा नव्हे.

८. पापी, ऋण बुडवणारे, चहाडखोर, लाच खाणारे खोटे अधिकारी, जे नराधम इहलोकीं कल्मष उत्पन्न करतात त्यांचें कर्म हा आमगंध होय; मांसभोजन हा नव्हे.

९. ज्यांना प्राण्यांविषयी दया नाही, जे इतरांना लुटून उपद्रव देतात, दुःशील, भेसूर, शिवीगाळ देणारे व अनादर करणारे (त्यांचें कर्म)–हा आमगंध होय; मांसभोजन हा नव्हे.

१०. अशा कर्मांत आसक्त झालेले, विरोध करणारे, घात करणारे, सदोदित अशा कर्मांत गुंतलेले की जे परलोकीं अंधकारांत शिरतात व वर पाय, खाली डोकें होऊन नरकांत पडतात (त्यांचें कर्म)–हा आमगंध होय; मांसभोजन हा नव्हे.

११. मत्स्यमांसाचा आहार वर्ज्य करणें, नागवेपणा, मुंडण, जटा, राख फासणें, खरखरीत अजिनचर्म, अग्निहोत्राची उपासना किंवा इहलोकींच्या दुसऱ्या विविध तपश्चर्या, मंत्राहुति, यज्ञ आणि शीतोष्णसेवनाने तप करणें, या गोष्टी कुशंकांच्या पार न गेलेल्या मर्त्याला पावन करूं शकत नाहीत.

१२. इंद्रियांत संयम ठेवून व इंद्रियें जाणून वागणारा, धर्मस्थित, आर्जव व मार्दव यांत संतोष मानणारा, संगातीत व ज्याचें सर्व दुःख नाश पावलें असा जो धीर पुरुष, तो दृष्ट आणि श्रुत पदार्थांत बद्ध होत नाही.

१३. हा अर्थ भगवंताने पुनः पुनः प्रकाशित केला आणि त्या मंत्रपारगाने (ब्राह्मणतापसाने) तो जाणला. हा अर्थ त्या निरामगंध, अनासक्त आणि अदम्य मुनीने रम्य गाथांनी प्रकाशित केला.

१४. निरामगंध आणि सर्व दुःखांचा नाश करणारें असें बुद्धाचें सुभाषित वचन ऐकून तो (तापस) नम्रपणें तथागताच्या पायां पडला आणि त्याने येथेच प्रव्रज्या घेतली.

## श्रमणांनी केलेलें मांसाहाराचें समर्थन

हें सुत्त फार प्राचीन आहे. पण तें खास काश्यप बुद्धाने

उपदेशिलेलें होतें, असें समजण्याला बळकट आधार नाही. बुद्धसमकालीन भिक्षु मांसाहाराचें समर्थन येणेंप्रमाणें करीत, एवढेंच समजावें.

या सुत्तांत तपश्चर्या निरर्थक गणली आहे. हें मत जैन श्रमणांना पसंत पडलें नसतें. कां की, ते वारंवार तपश्चर्या करीत असत. तथापि मांसाहाराचें त्यांनी अशाच प्रकारें समर्थन केलें असतें. कारण, ते पूर्वकालीन तपस्व्यांप्रमाणे जंगलांतील फळामुळांवर निर्वाह करून न राहतां लोकांनी दिलेल्या भिक्षेवर अवलंबून राहत; आणि त्या काळीं निर्मांसमत्स्य भिक्षा मिळणें अशक्य होतें. ब्राह्मण यज्ञांत हजारों प्राण्यांचा वध करून त्यांचें मांस आजूबाजूच्या लोकांना वाटीत. खेडयांतील लोक देवतांना प्राण्यांचें बलिदान करून त्यांचें मांस खात. याशिवाय खाटीक लोक भर चौकांत गाईला मारून तिचें मांस विकावयास बसत. अशा परिस्थितींत पक्व अन्नाच्या भिक्षेवर अवलंबून राहणाऱ्या श्रमणांना मांसाशिवाय भिक्षा मिळणें कसें शक्य होतें?

जैनांच्या समजुतीप्रमाणे पृथ्वीकाय, अप्काय, वायुकाय, अग्निकाय, वनस्पतिकाय, आणि त्रसकाय असे सहा जीवभेद आहेत (पृ० ९४). पृथ्वीकाय म्हणजे पृथ्वीपरमाणु, त्याचप्रमाणें जल, वायु आणि अग्नि यांचे परमाणु सजीव आहेत. वनस्पतिकाय म्हणजे वृक्षादिक वनस्पति. ते सजीव आहेत, हें सांगावयाला नकोच. त्रसकाय म्हणजे किडामुंगीपासून तहत हत्तीपर्यंत लहान मोठे सर्व प्राणी. या सहा कायांपैकी कोणत्याही प्राण्यांची हिंसा करणें जैन श्रमण पाप समजतात. म्हणून ते रात्रींचा दिवा लावीत नसत, थंड पाणी पीत नसत आणि पृथ्वीपरमाणुआदिकांचा संहार होऊं नये, याबद्दल फार काळजी घेत.

परंतु जैन उपासक शेत नांगरीत, धान्य पेरीत आणि तें शिजवून अन्न तयार करीत. या कृत्यांत पृथ्वी, अप्, तेज, वायु,

वनस्पति आणि त्रस या सहाही प्रकारच्या जीवांचा संहार होत असे. पृथ्वी नांगरीत असतां पृथ्वीपरमाणुच नष्ट होतात असें नव्हे, तर किडे, मुंग्या इत्यादिक बारीकसारीक लाखो प्राणी मरतात. धान्य शिजवतांना वनस्पतिकाय, अप्काय, अग्निकाय व वायुकाय या सर्व प्राण्यांचा उच्छेद होतो. असें असतां त्या अन्नाची भिक्षा जैन साधु घेतातच. तर मग एखाद्या जैन उपासकाने तयार केलेली मांसभिक्षा घेण्याला प्राचीन जैन श्रमणांना हरकत कोणती होती? आणि त्या कृत्याचें समर्थन त्यांनी आमगंधसुत्ताच्या धर्तीवरच केलें नसतें काय?

## गोमांसाहाराविरुद्ध चळवळ

आता मांसाहाराविरुद्ध चळवळ कशी सुरू झाली याविषयीं थोडक्यांत विचार करूं. सर्वांत प्रथम गोमांसाहाराच्या निषेधाबद्दल बौद्धांनीच चळवळ सुरू केली असावी. नवव्या प्रकरणांत (पृ० ६२) गायींची योग्यता दर्शविणाऱ्या ब्राह्मण-धम्मिक-सुत्तांतील दोन गाथा दिल्या आहेत; त्याशिवाय ह्या गाथा पहा.

न पादा न विसाणेन नास्सु हिंसन्ति केनचि।
गावो एळकसमाना सोरता कुम्भदूहना।
ता विसाणे गहेत्वान राजा सत्थेन घातयि॥
ततो च देवा पितरो इन्दो असुररक्खसा।
अधम्मो इति पक्कन्दुं यं सत्थं निपती गवे॥

'मेंढरांप्रमाणे नम्र आणि घडाभर दूध देणाऱ्या गाई पायाने, शिंगाने किंवा दुसऱ्या कोणत्याही अवयवाने कोणाचीही हिंसा करीत नाहीत. त्यांना (ब्राह्मणाच्या सांगण्यावरून) इक्ष्वाकु राजाने शिंगांना धरून ठार मारलें. तेव्हा गाईंवर शस्त्रप्रहार झाल्यामुळे देव, पितर, इंद्र, असुर आणि राक्षस अधर्म झाला म्हणून आक्रोश करते झाले!'

## पुष्कळ काळ ब्राह्मणांनी गोमांस सोडलें नाहीं

बौद्धांच्या आणि जैनांच्या प्रयत्नाने गोमांसाहाराचा निषेध होत गेला, तरी ब्राह्मण लोकांत त्याची मनाई होण्यास बरींच शतकें लागलीं. प्रथमतः यज्ञासाठी दीक्षा घेतलेल्याने गोमांस खाऊं नये अशी एक शक्कल निघाली.

"स धेन्वै चानडुहश्च नाश्नीयात् । धेन्वनडुहौ वाऽइदं सर्वं बिभृतस्ते देवा अब्रुवन् धेन्वनडुहौ वाऽइदं सर्वं बिभृतो हन्त यदन्येषां वयसां वीर्यं तद्धेन्वनडुहयोर्दधामेति....तस्माद्धेन्वनडुहयोर्नाश्नीयात् तदु होवाच याज्ञवल्क्योऽश्नाम्येवाहं मांसलं चेद्भवतीति ॥"

'गाई आणि बैल खाऊं नयेत. गाई आणि बैल हें सर्व धारण करतात. ते देव म्हणाले, गाई आणि बैल हें सर्व धारण करतात, अतएव दुसऱ्या जातीच्या पशूचें जें वीर्य तें गाई आणि बैलांमध्ये घालू या....म्हणून गाईबैल खाऊं नयेत. पण याज्ञवल्क्य म्हणतो, शरीर मांसल होतें, म्हणून मी (हें मांस) खाणारच.' (शतपथ ब्राह्मण ३।१।२।२१).

हा वाद यज्ञशाळेपुरताच होता. कित्येकांचें म्हणणें होतें की, दीक्षिताने यज्ञशाळेंत प्रवेश केल्यावर गोमांस खाऊं नये. परंतु याज्ञवल्क्याला हें मत पसंत नव्हतें. शरीर पुष्ट होत आहे, म्हणून तें वर्ज्य करण्यास तो तयार नव्हता. इतर प्रसंगीं गोमांसाहार करण्या-संबंधाने ब्राह्मणांमध्ये वाद मुळीच नव्हता. इतकेंच नव्हे, तर कोणी तसाच प्रतिष्ठित पाहुणा आला असतां मोठा बैल मारून त्याचा आदरसत्कार करण्याची पद्धति फार प्रसिद्ध होती. एक तेवढया गौतमसूत्रकाराने गोमांसाहाराचा निषेध केला आहे. पण त्याला देखील मधुपर्कविधि पसंत असावा. ब्राह्मणांमध्ये हा विधि भवभूतीच्या कालापर्यंत तुरळक चालू होता, असें वाटतें. उत्तर-

सारथ्याकडून बंधुमा राजाला हें वर्तमान समजलें, तेव्हा त्यानें कुमाराचीं सुखसाधनें आणखीही वाढविलीं. इ०.

आणि भिक्षुहो, शेंकडो हजारो वर्षांनंतर पुन्हा सर्व सिद्धता करून विपस्सी कुमार सारथ्याबरोबर उद्यानाकडे जाण्यास निघाला. वाटेंत एका परिव्राजकाला पाहून तो सारथ्याला म्हणाला, "हा पुरुष कोण आहे? याचें डोकें आणि वस्त्रें इतरांसारखीं नाहीत."

सा०–महाराज, हा प्रव्रजित आहे.

वि०–प्रव्रजित म्हणजे काय?

सा०–प्रव्रजित म्हणजे, धर्मचर्या चांगली, समचर्या चांगली, कुशल क्रिया चांगली, पुण्य क्रिया चांगली, अविहिंसा चांगली, भूतदया चांगली, असें समजणारा.

वि०–तर मग त्याच्याकडे रथ ने.

त्याप्रमाणें सारथ्यानें प्रव्रजिताकडे रथ नेला, तेव्हा विपस्सी कुमार त्याला म्हणाला, "तूं कोण आहेस? तुझें डोकें आणि वस्त्रें इतरांसारखीं नाहीत."

प्र०–महाराज मी प्रव्रजित आहें. धर्मचर्या, समचर्या, कुशल-क्रिया, पुण्यक्रिया, अविहिंसा, भूतानुकंपा चांगली, असें मी समजतों.

ठीक आहे, असें म्हणून विपस्सी कुमार सारथ्याला म्हणाला, "मित्रा सारथे, तूं रथ घेऊन अंतःपुराकडे परत जा. मी केस व दाढीमिशा काढून, काषाय वस्त्रें धारण करून अनागारिक (गृहवियुक्त) प्रव्रज्या घेतों."

सारथि रथ घेऊन अंतःपुराकडे गेला. पण विपस्सी कुमारानें तेथेंच प्रव्रज्या घेतली.

६

आणि भिक्षुहो, विपस्सी बोधिसत्त्व एकांतांत विचार करीत असतां त्याच्या मनांत विचार आला की, लोकांची अत्यंत वाईट स्थिति आहे. ते जन्माला येतात, म्हातारे होतात आणि मरतात; च्युत होतात आणि उत्पन्न होतात; तरी या दुःखापासून सुटका कशी करून घ्यावी हें जाणत नाहीत. ते हें कधी जाणतील?

आणि भिक्षुहो, जरामरण कशाने उत्पन्न होतें याचा विपस्सी बोधिसत्त्व विचार करूं लागला. तेव्हा त्याने प्रज्ञालाभाने जाणलें की, जन्म आला म्हणजे जरामरण येतें. आणि जन्म कशामुळे येतो? भवामुळे. भव कशामुळे? उपादानामुळे. उपादान तृष्णेमुळे, तृष्णा वेदनेमुळे, वेदना स्पर्शामुळे, स्पर्श षडायतनामुळे, षडायतन नामरूपामुळे, नामरूप विज्ञानामुळे उत्पन्न होतें. ही कारणपरंपरा विपस्सी बोधिसत्त्वाने अनुक्रमाने जाणली. त्याचप्रमाणें जन्म नसला तर जरामरण येत नाही. भव नसला तर जन्म होत नाही....विज्ञान नसलें तर नामरूप होत नाही, हें देखील त्याने जाणलें. आणि तेणेंकरून त्याच्या मनांत धर्मचक्षु, धर्मज्ञान, प्रज्ञा, विद्या आणि आलोक उत्पन्न झाला.

७

आणि भिक्षुहो, अर्हन्, सम्यक् संबुद्ध विपस्सी भगवंताच्या मनांत धर्मोपदेश करण्याचा विचार आला. पण त्याला वाटलें, हा गंभीर, दुर्दर्श, समजण्यास कठिण, शांत, प्रणीत, तर्काने न कळण्यासारखा, निपुण, पंडितांनीच जाणण्याला योग्य असा धर्म मी प्राप्त करून घेतला आहे. पण हे लोक चैनींत गढलेले, चैनींत रमणारे, अशांना कारणपरंपरा, प्रतीत्यसमुत्पाद समजणें कठीण आहे. सर्व संस्कारांचें शमन, सर्व उपाधींचा त्याग, तृष्णेचा क्षय, विराग, निरोध, निर्वाण देखील त्यांना

दुर्गम आहे.' मी धर्मोपदेश केला आणि तो त्यांना समजला नाही, तर मलाच त्रास, मलाच उपद्रव होईल.

आणि भिक्षुहो, विपस्सी भगवंताला पूर्वी कधी न ऐकलेल्या पुढील गाथा अकस्मात सुचल्या—

जें मीं प्रयासाने मिळविलें आहे, तें इतरांस सांगणें नको
रागद्वेषाने भरलेल्यांना या धर्माचा बोध सहज होण्याजोगा नाही ॥
प्रवाहाच्या उलट जाणारा, निपुण, गंभीर, दुर्दर्श आणि अणुरूप
असा हा धर्म अंधकाराने वेढलेल्या कामासक्तांना दिसणार नाही ॥

भिक्षुहो, अर्हन्त सम्यक्संबुद्ध विपस्सी भगवंताचें ह्या विचाराने धर्मोपदेशाकडे चित्त न वळतां एकाकी राहण्याकडे वळलें. महाब्रह्मा तो विचार जाणून आपल्याच मनांत उद्गारला, "अरेरे! जगाचा नाश होत आहे! विनाश होत आहे!! कां की, अर्हन् सम्यक् संबुद्ध विपस्सी भगवंताचें मन धर्मोपदेश करण्याकडे न वळतां एकाकी राहण्याकडे वळतें!"

तेव्हा भिक्षुहो, जसा एखादा बलवान् पुरुष आखडलेला हात पसरतो, किंवा पसरलेला आखडतो, इतक्या त्वरेने तो महाब्रह्मा ब्रह्म-लोकांत अंतर्धान पावून विपस्सी भगवंतापुढे प्रगट झाला आणि आपलें उपवस्त्र एका खांद्यावर करून उजवा गुढगा जमिनीला टेकून हात जोडून भगवंताला म्हणाला, "भगवन्, धर्मदेशना कर! सुगत, धर्मदेशना कर! कांही प्राणी असे आहेत की, त्यांचे डोळे धुळीने भरले नाहीत. ते धर्म ऐकण्यास न मिळाल्यामुळे नाश पावत आहेत. असे धर्म जाणणारे लोक मिळतील."

विपस्सी भगवंताने आपल्या मनांतील विचार तीनदा प्रगट केला आणि ब्रह्मदेवाने तीनदा भगवंताला तशीच विनंती केली. तेव्हा भगवंताने ब्रह्मदेवाची विनंती जाणून आणि प्राण्यावरील दयेमुळे, बुद्ध-

नेत्राने जगाचें अवलोकन केलें आणि ज्यांचे डोळे धुळीने थोडे भरले आहेत, ज्यांचे फार भरले आहेत, तीक्ष्णेंद्रियांचे, मृदु इंद्रियांचे, चांगल्या आकाराचे, वाईट आकाराचे, समजावून देण्यास सोपे, समजावून देण्यास कठीण; आणि कांही परलोकाचें व वाईट गोष्टीचें भय बाळगणारे, असे प्राणी त्याला दिसले. ज्याप्रमाणें कमलांनी भरलेल्या सरोवरांत कांही कमलें पाण्याच्या आंतच बुडून राहतात, कांही पाण्याच्या सपाटीवर येतात, आणि कांही पाण्याहून वर उगवलेलीं असतात, पाण्याचा त्यांना स्पर्श होत नाही, तशा प्रकारें विपस्सी भगवंताने भिन्नभिन्न प्रकारचे प्राणी पाहिले.

आणि भिक्षुहो, विपस्सी भगवंताच्या मनांतील हा विचार जाणून ब्रह्मदेवाने पुढील गाथा म्हटल्या—

"शैलावर, पर्वताच्या मस्तकावर उभा राहून ज्याप्रमाणें सभोवारच्या लोकांकडे पाहावें, त्याप्रमाणें हे सुमेध, धर्ममय प्रासादावर चढून समन्तात् पाहणारा असा तूं शोकरहित होत्साता जन्म आणि जरा यांनी पीडलेल्या जनतेकडे पाहा ! ॥

"वीरा, ऊठ. तूं संग्राम जिंकला आहेस. तूं ऋणमुक्त सार्थवाह आहेस. अतएव जगांत संचार कर ॥

"भगवन् धर्मोपदेश कर, जाणणारे असतीलच ॥"

आणि भिक्षुहो, अर्हन् सम्यक् संबुद्ध विपस्सी भगवंताने ब्रह्मदेवाला गाथांनी उत्तर दिलें.

"त्यांच्याकरितां अमरत्वाचीं द्वारें उघडलीं आहेत. ज्यांस ऐकण्याची इच्छा असेल त्यांनी भाव धरावा ॥

"उपद्रव होईल म्हणून मी लोकांना, हे ब्रह्मदेवा, श्रेष्ठ प्रणीत धर्म उपदेशिला नाही ॥"

आणि भिक्षुहो, विपस्सी भगवंताने धर्मोपदेश करण्याचें वचन दिलें, असें जाणून तो महाब्रह्मा भगवंताला अभिवादन आणि प्रदक्षिणा करून, तेथेच अंतर्धान पावला.



ह्या सात खंडांत **तिसरा खंड** पहिल्याने रचण्यांत आला असावा. कां की, तो त्रिपिटकामधील सर्वांत प्राचीन सुत्तनिपात ग्रन्थांतील सेलसुत्तांत सांपडतो. हेंच सुत्त मज्झिमनिकायांत (नं० ९२) आलें आहे. त्यापूर्वींच्या (नं० ९१) ब्रह्मयुसुत्तांत आणि दीघनिकायातील अंबट्ठसुत्तांतही याचा उल्लेख आला आहे. बुद्धकालीन ब्राह्मण लोकांत ह्या लक्षणांचें फार महत्त्व समजलें जात असे. तेव्हा बुद्धाच्या शरीरावर हीं सर्व लक्षणें होतीं असें दाखवून देण्याच्या उद्देशानें बुद्धानंतर एक दोन शतकांनी हीं सुत्तें रचण्यांत आलीं असावीं, आणि त्यानंतर ह्या महापदान सुत्तांत तीं दाखल केलीं असावीं. गोतम बोधिसत्त्व बुद्ध झाल्यानंतर ब्राह्मण पंडित त्याचीं लक्षणें पाहत. परंतु ह्या सुत्तांत विपस्सी कुमाराचीं लक्षणें त्याच्या जन्मानंतर लौकरच पाहण्यांत आलीं असें दर्शविलें आहे आणि त्यामुळे एक मोटी विसंगति उत्पन्न झाली आहे. ती ही की, त्यास चाळीस दांत आहेत, ते सरळ आहेत, त्यांच्यात विवरें नाहीत आणि त्याच्या दाढा शुभ्र पांढऱ्या आहेत, हीं चार लक्षणें त्यांत राहून गेलीं. जन्मल्याबरोबर मुलाला दांत नसतात, याची आठवण या सुत्तकाराला राहिली नाही!

त्यानंतर **दुसरा खंड** तयार करण्यांत आला असावा. त्यात जे स्वभावनियम सांगितले आहेत ते मज्झिमनिकायांतील अच्छरियअब्भुतधम्मसुत्तांत (नं. १२३) सापडतात. बोधिसत्त्वाला विशेष महत्त्व आणण्यासाठी ते रचले आहेत. यांपैकी त्याची माता उभी असतां प्रसवली, आणि तो सात दिवसांचा झाल्यावर परलोकवासी झाली, हे दोन खरोखरच घडून आले असावेत. बाकी कविकल्पना.

त्यानंतरचा किंवा त्याच्या मागेपुढे कांही काळाने लिहिलेला **सातवा खंड** होय. हा मज्झिमनिकायांतील अरियपरियेसनसुत्तांत, निदान-वग्गसंयुत्तांत (६।१) आणि महावग्गाच्या आरंभीं सापडतो. ब्रह्मदेवाने केलेल्या प्रार्थनेमुळे बुद्धाने धर्मोपदेशाला सुरवात केली, हें दाखवून देण्यासाठी हा खंड रचला गेला. मैत्री, करुणा, मुदिता आणि उपेक्षा या चार उदात्त मनोवृत्तींवर हें रूपक आहे असें मी बुद्ध धर्म आणि संघ या पुस्तकांतील पहिल्या व्याख्यानांत दाखवून दिलेंच आहे.

'यानंतर **चौथा** तीन प्रासादांचा **खंड.** त्याचा उल्लेख अंगुत्तर-निकायाच्या तिकनिपातांत (सुत्त ३८) आणि मज्झिमनिकायांतील माग-न्दियसुत्तात (नं० ७५) आला आहे. पहिल्या ठिकाणीं, मी पित्याच्या घरीं असतांना मला राहण्यासाठी तीन प्रासाद होते, असा उल्लेख आहे. पण दुसऱ्यांत, तरुणपणीं मी तीन प्रासादांत राहत होतों, असा मजकूर असून पित्याचा उल्लेख नाही. शाक्य राजे वज्जींएवढे संपन्न नव्हतेच, आणि वज्जींचे तरुण कुमार देखील अशा रीतीने चैनींत राहत होते याबद्दल कोठेच पुरावा सापडत नाही. याच्या उलट, ते अत्यंत साधेपणाने वागत व चैनीची मुळीच पर्वा करीत नसत, असें वर्णन ओपम्मसंयुत्तांत (वग्ग १, सुत्त ५) सापडतें. भगवान् म्हणतो, "भिक्षुहो, सध्या लिच्छवी लाकडाच्या ओंडक्याच्या उशा करून राह-तात, आणि मोठ्या सावधगिरीने आणि उत्साहाने कवाइत शिकतात. यामुळे मगधाच्या अजातशत्रु राजाला त्यांच्यावर हल्ला करतां येत नाही. परंतु भविष्यकाळीं लिच्छवी सुकुमार होतील, आणि त्यांचे हातपाय कोमल बनतील. ते मऊ बिछान्यावर कापसाच्या उशा घेऊन निजतील आणि तेव्हा अजातशत्रु राजा त्यांच्यावर हल्ला करण्यास समर्थ होईल.

वज्जींसारखे संपन्न गणराजे जर इतक्या सावधानपणें वागत तर त्यांच्या मानाने बरेच गरीब असलेले शाक्य राजे मोठमोठाल्या प्रासा-दांत चैनींत राहत असत हें संभवतच नाही. जर खुद्द शुद्धोदनालाच

शेती करावी लागत असे, तर आपल्या मुलाला तो तीन प्रासाद कसे बांधून देईल? तेव्हा ही प्रासादांची कल्पना बुद्धाच्या चरित्रांत मागाहून शिरली यांत शंका राहत नाही. ती महापदान सुत्तावरून घेतली किंवा स्वतंत्रपणेंच एखाद्या भाविकाने बुद्धचरित्रांत दाखल केली, हें सांगतां येणें शक्य नाही.

वर दिलेला **सहावा खंड** आणि निदानवग्गसंयुत्ताचीं नं० ४ ते ६ सुत्तें तंतोतंत एकच आहेत. यावरून असें दिसतें की, या महापदान सुत्तावरूनच तीं सुत्तें घेतलीं असावींत. गोतम बुद्धाच्या पूर्वीचे सहाही बुद्ध विचार करीत असतांना त्यांना ही प्रतीत्यसमुत्पादाची कारणपरंपरा जशी सापडली, तशीच ती गोतमाला देखील बोधिसत्त्वावस्थेंत असतांनाच सापडली असें निदानवग्गसंयुत्ताच्या दहाव्या सुत्तांत वर्णिलें आहे. परंतु महावग्गांत बुद्ध झाल्यानंतर गोतमाने ही कारणपरंपरा मनांत आणली असा आरंभींच उल्लेख आहे. हा प्रतीत्यसमुत्पाद गोतम बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर एक दोन शतकांनी लिहिला असावा आणि त्याला महत्त्व आणण्यासाठी पूर्वीच्या बुद्धाच्या चरित्रांत तो दाखल केला गेला असावा. होतां होतां खुद्द बुद्धाच्या चरित्रांत देखील त्याला विशेष महत्त्व देण्यांत आलें. याचा परिणाम एवढाच झाला की, चार आर्यसत्यांचें साधें तत्त्वज्ञान मागें पडून या गहन तत्त्वज्ञानाला नसतेंच महत्त्व आलें.

उद्यानयात्रेचा **पांचवा खंड** त्रिपिटक वाङ्मयांत गोतम बुद्धाच्या चरित्रांत मुळीच घालण्यांत आला नाही. तो ललितविस्तर, बुद्धचरित्र आणि जातकाची निदानकथा यांत जशाचा तसा किंवा थोडीबहुत अतिशयोक्ति करून घेण्यांत आला. या शेवटल्या प्रकरणांत तर, 'ततो बोधिसत्तो सारथिं सम्म को नाम एसो पुरिसो केसा पिस्स न यथा अञ्ञेसं ति महापदाने आगतनयेन पुच्छित्वा' असें म्हटलें आहे. त्यावरून या सर्व ग्रन्थकारांनी हा मजकूर महापदानसुत्तावरून घेतला असें सिद्ध होतें.

**पहिल्या खंडांत** सांगितल्याप्रमाणें गोतम बुद्धाचे अग्र श्रावक वगैरेचीं नांवें या सुत्ताच्या प्रस्तावनेंत दिलींच आहेत. गोतम बुद्ध क्षत्रिय असल्यामुळे त्याच्या बापाची राजधानी कपिलवस्तु होती असें म्हटलें आहे. याशिवाय त्याचें गोत्र गोतम ठरविलें आहे. याची चर्चा चौथ्या प्रकरणांत केली असून शुद्धोदन शाक्य कपिलवस्तूंत कधीच राहत नव्हता हें सिद्ध केलेंच आहे. शाक्यांचें गोत्र आदित्य होतें आणि त्यांना शाक्य या नांवानेच विशेष ओळखत असत. तसें नसतें तर बुद्ध भिक्षूंना शाक्यपुत्रीय श्रमण ही संज्ञा मिळली नसती. बुद्धाचें गोतम गोत्र असतें तर त्यांना गोतम किंवा गोतमक श्रमण म्हणण्यांत आलें असतें.

---

## परिशिष्ट दुसरें

# वज्जींच्या अभ्युन्नतीचे सात नियम

भगवान राजगृह येथे गृध्रकूट पर्वतावर राहत होता. त्या वेळीं अजातशत्रु राजा वज्जींवर स्वारी करण्याच्या विचारांत होता. त्या बाबतींत बुद्ध भगवंताचें मत काय हें जाणण्यासाठी त्याने आपल्या वस्सकार नांवाच्या ब्राह्मण अमात्याला भगवंताजवळ पाठविलें. त्या अमात्याने अजातशत्रूचा बेत भगवंताला निवेदित केला. तेव्हा आनंद भगवंताला वारा घालीत होता त्याजकडे वळून भगवान् म्हणाला, "आनंदा, वज्जी वारंवार सभा भरवतात आणि एकत्र होतात, असें तू ऐकलें आहेस काय?"

आ०—होय भदन्त, वज्जी वारंवार सभा भरवतात आणि एकत्र होतात, असें मी ऐकलें आहे.

भ०—वज्जी समग्र एकत्र होतात, समग्र उठतात आणि समग्रपणें आपलीं कामें करतात काय?

आ०—होय भदन्त, असें मी ऐकलें आहे.

भ०—वज्जी आपण न केलेला कायदा केला आहे असें म्हणत नाहीत ना? किंवा केलेल्या कायद्याचा भंग करीत नाहीत ना? वज्जींच्या कायद्याला अनुसरून ते वागत आहेत काय?

आ०—होय भदन्त, वज्जी कायदेशीरपणें वागतात, असें माझ्या ऐकण्यांत आलें आहे.

भ०—वृद्ध राजकारणी पुरुषांना वज्जी मान देतात काय? आणि त्यांची सल्ला स्वीकारतात काय?

आ०—होय भदन्त, वज्जी वृद्ध राजकारणी पुरुषांचा मान ठेवतात व त्यांचें सांगणें ऐकतात.

भ०—ते आपल्या राज्यांतील विवाहित किंवा अविवाहित स्त्रियांवर बळजबरी करीत नाहीत ना?

आ०—भदन्त, वज्जींच्या राज्यांत स्त्रियांवर जबरदस्ती होत नाही, असें मी ऐकलें आहे.

भ०—वज्जींच्या नगरांतील आणि नगराबाहेरील देवस्थानांची ते योग्य जोपासना करतात ना?

आ०—ते आपल्या देवस्थानांची योग्य काळजी घेतात, असें मी ऐकलें आहे.

भ०—आपल्या राज्यांत आलेले अर्हन्त सुखानें राहावे व न आलेल्या अर्हन्तांना राज्यांत येण्यास उत्तेजन मिळावें, यास्तव अर्हन्तांना कोणत्याही प्रकारें ताप पोचूं नये याबद्दल वज्जी व्यवस्था ठेवतात ना?

आ०—होय भदन्त, अर्हन्तांना ताप पोचूं नये याबद्दल वज्जी दक्षता बाळगतात, असें मी ऐकलें आहे.

तेव्हा भगवान वस्सकार अमात्याला म्हणाला, "हे ब्राह्मणा, एके वेळीं मी वैशालीमध्ये राहत असतां हे सात अभ्युन्नतीचे नियम वज्जींना उपदेशिले. जोंपर्यंत या नियमांना अनुसरून वज्जी वागतील, तोंपर्यंत त्यांची उन्नतीच होईल, अवनति होणार नाही."

वस्सकार म्हणाला, "भो गोतम, यांपैकी एका नियमाला जरी वज्जी अनुसरले तरी त्यांची उन्नति होईल, अवनति होणार नाही. तर मग त्यांनी सातही नियम पाळले, तर त्यांची उन्नति होईल हें सांगावयालाच नको."

## सात नियमांवरील टीका

ह्या सात नियमांवरील बुद्धघोषाचार्यकृत अट्ठकथेचा गोषवारा—

(१) **वारंवार एकत्रित होतात.** काल जमलों होतों, परवाही जमलों होतों, तेव्हा आज आणखी कशाला जमा, असें न म्हणतां एकत्र जमतात. अशा रीतीने एकत्र न झाले तर चोहोंकडून आलेल्या बातम्या समजून घेतां येत नाहीत. अमुक गावाच्या किंवा शहराच्या सीमेबद्दल विवाद उपस्थित झाले आहेत, किंवा चोर बंड करीत आहेत, इत्यादिक वर्तमान ध्यानांत येत नाही. राज्यकर्ते बेसावध आहेत असें जाणून चोर देखील लूटफाट करतात. याप्रमाणे राज्यकर्त्यांची अवनति होते. वारंवार एकत्र जमल्याने सगळ्या बातम्या ताबडतोब समजतात, आणि फौज पाठवून बंदोबस्त ठेवतां येतो. राज्यकर्ते सावध आहेत असें जाणून चोर देखील टोळ्या करून राहत नाहीत; टोळ्या मोडून पळ काढतात. याप्रमाणे राज्यकर्त्यांची उन्नति होते.

(२) **समग्र एकत्र होतात** इत्यादि. आज काही काम आहे, किंवा मंगलकार्य आहे, असें म्हणून चुकारपणा न करतां एकत्र होण्यासाठी नगाऱ्याचा शब्द कानीं पडतांच एकत्र होतात. एकत्र झाल्यावर विचारपूर्वक सर्व कामांचा निकाल लावल्यावाचून जाऊं लागले, तर त्यांना 'समग्र उठतात' असें म्हणतां येत नाही. तसें न करता सर्व कृत्ये आटपून एकत्र उठतात, समग्रपणें आपलीं कामें करतात, म्हणजे जर एखाद्या राजाला कांही काम पडलें, तर इतर सर्व राजे त्याच्या मदतीला जातात. किंवा दुसऱ्या राज्यांतील कोणी पाहुणा आला तर त्याच्या आदरसत्काराला सगळेच हजर असतात.

(३) **न केलेला कायदा** इत्यादिक. म्हणजे न ठरलेली जकात, कर वगैरे घेत नाहीत, पूर्वी ठरल्याप्रमाणेच घेतात. केलेल्या कायद्याचा भंग करीत नाहीत, कायद्याला अनुसरून वागतात. म्हणजे चोर म्हणून कोणाला धरून आणलें तर त्याला चौकशी केल्यावाचून शिक्षा देत नाहीत. अशा रीतीने राज्यकर्ते वागले नाहीत, तर लोक उपद्रुत होतात; आणि सरहद्दीवर जाऊन स्वतः बंडखोर होतात किंवा बंडखोरांच्या

टोळ्यांत सामील होतात आणि राज्यावर हल्ला करतात. ह्याप्रमाणे राज्यकर्त्यांची अवनति होते. कायदेशीरपणें वागल्याने वेळेवर कर वसूल होतो, तिजोरी वाढते आणि त्यायोगें सैन्याचा व खासगी खर्च व्यवस्थित चालतो.

**वज्जींचा कायदा** म्हणजे, जर चोर म्हणून कोणाला पकडून आणलें, तर वज्जी राजे त्याला एकदम शिक्षा न देतां विनिश्चय महामात्यांच्या स्वाधीन करीत. ते अधिकारी तो चोर आहे किंवा नाही याची नीट चौकशी करून चोर नसला तर सोडून देत, आणि चोर असला तर आपण कांही एक मत न देतां व्यावहारिकांच्या स्वाधीन करीत. ते देखील तशीच चौकशी करून चोर नसला तर त्याला सोडून देत, आणि चोर असला तर अंतःकारिक नांवाच्या अधिकाऱ्यांच्या हवालीं करीत. ते देखील चौकशी करून चोर नसला तर सोडून देत, आणि चोर असला तर अष्टकुलिकांच्या स्वाधीन करीत. ते पूर्वीप्रमाणेंच चौकशी करून चोर ठरला तर सेनापतीच्या, सेनापति उपराजाच्या, आणि उपराजा राजाच्या स्वाधीन करी. राजा चोर नसला तर त्याला सोडून देई, पण चोर ठरला तर प्रवेणीपुस्तक (कायद्याचें पुस्तक) वाचावयाला लावी. त्या पुस्तकांत अमुक कृत्याला अमुक दण्ड असें लिहून ठेवलेलें असे. त्याला अनुसरून त्या चोराला राजा दण्ड करी. असा हा प्राचीन वज्जींचा कायदा.

(४) आपल्या वृद्ध राजकारणी पुरुषांचा मान ठेवला नाही, आणि त्यांची वारंवार भेट घेतली नाही, तर त्यांची सल्ला मिळावयाची नाही, आणि तेणेंकरून राज्यकर्त्यांची अवनति होईल. पण जे वडिलांची सल्ला घेतात त्यांना अमुक प्रसंगीं कसें वागावें हें बरोबर समजतें, आणि तेणेंकरून त्यांची उन्नति होते.

(५) विवाहित किंवा अविवाहित स्त्रियांवर बळजबरी केली, तर राज्यांतील लोक असंतुष्ट होतात. आम्ही ज्या मुलींना लहानाचें मोठें

केलें; त्यांना हें राज्यकर्ते जबरदस्तीने आपल्या घरीं नेऊन ठेवतात, असें म्हणून लोक सरहद्दीवर जाऊन स्वतः बंड करतात, किंवा दुसऱ्या बंडखोरांना सामील होतात, आणि राज्यावर स्वाऱ्या करतात. बायकांवर बळजबरी झाली नाही, राज्यकर्त्यांकडून त्यांना रक्षण मिळालें, म्हणजे लोक निश्चिंतपणें आपलीं कामें करतात, आणि त्यामुळे राज्याच्या संपत्तीची अभिवृद्धि होते.

(६) देवस्थानांची योग्य जोपासना केली म्हणजे देवता राज्याचें रक्षण करतात.

(७) अर्हन्तांना कोणत्याही प्रकारचा ताप पोचूं देत नाहीत, म्हणजे त्यांच्या राहण्याच्या जागेच्या आसपास कोणी झाडें न तोडावीं, जाळीं पसरून मृगांना न पकडावें, तळ्यांत मासे मारूं नयेत, यासंबंधाने काळजी घेतात.

अट्ठकथेंत वज्जींच्या कायद्यांवर थोडीशी विस्तृत टीका आहे. चोराला पकडला तर त्याची चौकशी क्रमशः विनिश्चय महामात्य, व्यावहारिक, अंतःकारिक, अट्ठकुलिक, सेनापति, उपराजा आणि राजा असे सात प्रकारचे अधिकारी करीत असत. यांत अष्टकुलिक म्हणजे आजकालच्या ज्यूरीसारखे होते की काय हें सांगतां येत नाही. इतर अधिकाऱ्यांची अधिकारमर्यादा काय होती, हें देखील समजत नाही. राजा म्हणजे गणराजांचा अध्यक्ष. तो किती वर्षेपर्यंत अध्यक्ष असे, याची माहिती कोठेच सापडत नाही. वज्जींच्या कायद्यांचें पुस्तक लिहिलेलें होतें, तें साफ नष्ट झालें, ही मोठया दुःखाची गोष्ट होय. ग्रीक लोकांप्रमाणे जर आमच्या पूर्वजांना राज्यव्यवस्थेचें प्रेम असतें, तर ह्या गणराजांचा इतिहास लुप्तप्राय झाला नसता.

बायकांवर बळजबरी होऊं न देण्याविषयी वज्जी सावधगिरी बाळगीत, हा मुद्दा महत्त्वाचा आहे. गणराजे जेव्हा अव्यवस्थितपणें वागूं लागले, तेव्हा गरीब लोकांच्या बायकांवर जुलूम होऊं लागला, असें

अनुमान करण्यास हरकत नाही. त्यामुळे लोकांना एकसत्ताक राज्यपद्धति बरी वाटूं लागली. महाराजा फार झालें तर आपल्या शहरांतील कांही बायकांना झनानखान्यांत नेऊन ठेवी; पण हे गणराजे सगळ्या देशभर पसरले असल्यामुळे कोणत्याही गावांतील बाई यांच्या जुलमापासून मुक्त राहणें शक्य नव्हतें. यास्तव लोकांनी राजीखुषीने एकसत्ताक राज्यपद्धति स्वीकारली असावी.

एकदा हे राजे अव्यवस्थितपणाने वागूं लागले, म्हणजे त्यांच्यांत फाटाफूट होणें साहजिक होतें. वज्जी गणराजांत वस्सकार ब्राह्मणाने फूट पाडली, आणि त्यामुळे अजातशत्रूला त्यांचा पराजय करणें अगदी सोपें झालें. वज्जींच्या गणराज्याचा लय झाल्यावर लवकरच मल्लांचें गणराज्य देखील लयाला गेलें असावें. अशा रीतीने प्राचीन गणसत्ताक राज्यांचा नाश झाला. त्यांच्या संघटनेची आणि कायद्यांची तुरळक माहिती बौद्ध वाङ्मयांत शिल्लक राहिली, एवढेंच काय तें.

बौद्ध संघाने एकत्र जमून संघकृत्यें करण्याची जी पद्धति विनयपिटकांत दिली आहे, तिच्यावरून वज्जी इत्यादिक गणराजे एकत्र कसे जमत व आपल्या सभेचें काम कसें चालवीत याचें अनुमान करतां येतें.



## परिशिष्ट तिसरें

# अशोकाचा भाब्रू शिलालेख आणि त्यांत निर्देशिलेलीं सूत्रें

भाब्रू हें स्थान जयपुर संस्थानांतील एका डोंगराळ प्रदेशांत आहे. तेथे राहणाऱ्या भिक्षुसंघाने अशोक राजापाशीं संदेश मागित-ल्यामुळे अशोकाने हा संदेश पाठविला व तो एका शिलेवर कोरावयास लावला असावा. अशा प्रकारचे संदेश अशोक वारंवार पाठवीत असावा. परंतु त्यांपैकी जे त्याला महत्त्वाचे वाटत, तेच तो शिलांवर किंवा शिलास्तंभांवर कोरावयास लावी. ह्या शिलालेखांत निर्देशिलेलीं सूत्रें मगधदेशांतील बौद्धांनी वाचावीं असे संदेश तोंडीं किंवा पत्रीं अशोकाने पाठविलेच असतील; पण ते कोरावयास लावले नाहीत. कां की, आसपासचे संघ काय करतात, काय वाचतात, याचें वर्तमान त्याला वारंवार समजत होतें. त्यासाठी त्याने खास अधिकारी नेमले होते. परंतु राजपुतान्यासारख्या दूरच्या प्रदेशांतून बातम्या येण्यास उशीर लागत होता. तेव्हा असा एक शिलालेख तेथे राहणें अशोकाला योग्य वाटलें असावें. माझ्या समजुतीप्रमाणे या शिलालेखाचें भाषांतर खाली देत आहें.

### भाब्रू शिलालेखाचें भाषांतर

"प्रियदर्शी मगधराजा संघाला अभिवादन करून संघाचें स्वास्थ्य व सुखनिवास विचारतो. भदन्त, आपणाला, माझा बुद्ध धर्म व संघ यांविषयी किती आदर व भक्ति आहे हें माहीत आहेच. भगवान बुद्धाचें वचन सर्वच सुभाषित आहे. पण, भदन्त, जें मी येथे निर्देशितों तें एवढयाचसाठी की सद्धर्म चिरस्थायी व्हावा, आणि त्याचसाठी

बोलणें योग्य वाटतें. भदन्त, हे धर्मपर्याय (सूत्रें) आहेत--विनयसमुकसे, अलियवसानि, अनागतभयानि, मुनिगाथा, मोनेयसूते, उपतिसपसिने आणि राहुलाला केलेल्या उपदेशांत खोटें बोलण्याला उद्देशून जें भगवान बुद्धाने भाषण केलें तें. ह्या सूत्रांसंबंधाने, भदन्त, माझी इच्छा अशी की, तीं पुष्कळ भिक्षूंनी व भिक्षुणींनी वारंवार ऐकावीं व पाठ करावीं. त्याचप्रमाणे उपासकांनी व उपासिकांनी. भदन्त, हा लेख मी कोरावयास लावला आहे; कारण, माझें अभिहित (संदेश सर्वजण) जाणोत."



ह्या सात सुत्तांपैकी पहिलें विनयसमुत्कर्ष किंवा धर्मचक्रप्रवर्तन. त्याचें रूपांतर पांचव्या प्रकरणांत दिलेंच आहे (पूर्वार्ध १३६-१३८). बाकी राहिलेल्या सुत्तांचीं रूपान्तरें क्रमशः देत आहें.

## अलियवसानि किंवा अरियवंससुत्त

हें सुत्त अंगुत्तरनिकायाच्या चतुक्कनिपातात सापडतें. त्याचें रूपांतर येणेंप्रमाणे—

भिक्षुहो, हे चार आर्यवंश अग्र व फार दिवसांचे वंश आहेत. ते प्राचीन व असंकीर्ण असून कधीही संकीर्ण झाले नाहीत, संकीर्ण होत नाहीत व संकीर्ण होणार नाहीत. त्यांना कोणत्याही श्रमणांनी व ब्राह्मणांनी दोष लावलेला नाही. ते चार कोणते?

येथे भिक्षु मिळेल तशा चीवराने संतुष्ट होतो, अशा संतुष्टीची स्तुति करतो, चीवरासाठी अयोग्य आचरण करीत नाही, चीवर नाही मिळालें तर त्रस्त होत नाही, मिळालें तर हावरा न होतां, मत्त न होतां, आसक्त न होता, चीवरांत दोष जाणून केवळ मुक्तीसाठी तें वापरतो. आणि त्या आपल्या तशा प्रकारच्या संतुष्टीने आत्मस्तुति, व परनिंदा करीत नाही. जो अशा संतोषांत दक्ष, सावध, हुशार व स्मृतिमान् होतो, भिक्षुहो, त्यालाच प्राचीन अग्र आर्यवंशाला अनुसरून वागणारा भिक्षु म्हणतात.

पुनरपि, भिक्षुहो, भिक्षु मिळेल तशा भिक्षेने संतुष्ट होतो, अशा संतुष्टीची स्तुति करतो, भिक्षेसाठी अयोग्य आचरण करीत नाही. भिक्षा न मिळाल्यास त्रस्त होत नाही, मिळाल्यास हावरा न होतां, मत्त न होतां, आसक्त न होतां, अन्नांत दोष जाणून केवळ मुक्तीसाठी अन्न सेवन करतो; आणि त्या आपल्या तशा प्रकारच्या संतुष्टीने आत्मस्तुति व परनिंदा करीत नाही. जो अशा संतोषांत दक्ष, सावध, हुशार व स्मृतिमान होतो, भिक्षुहो, त्यालाच प्राचीन अग्र आर्यवंशाला अनुसरून वागणारा भिक्षु म्हणतात.

पुनरपि, भिक्षुहो, भिक्षु कशाही प्रकारच्या निवासस्थानाने संतुष्ट होतो, तशा प्रकारच्या संतुष्टीची स्तुति करतो, निवासस्थानासाटी अयोग्य आचरण करीत नाही, निवासस्थान न मिळालें तर त्रस्त होत नाही, मिळालें तर हावरा न होतां, मत्त न होतां, आसक्त न होतां, निवासस्थानांत दोष जाणून केवळ मुक्तीसाठी तें वापरतो आणि त्या आपल्या तशा प्रकारच्या संतुष्टीने आत्मस्तुति व परनिंदा करीत नाही. जो अशा संतोषांत दक्ष, सावध, हुशार व स्मृतिमान् होतो, त्यालाच प्राचीन अग्र आर्यवंशाला अनुसरून वागणारा भिक्षु म्हणतात.

पुनरपि, भिक्षुहो, भिक्षु समाधिभावनेंत आनंद मानतो, भावनारत होतो, क्लेश नष्ट करण्यांत आनंद मानतो, क्लेश नष्ट करण्यांत रत होतो. आणि तशा त्या भावनारामतेने आत्मस्तुति व परनिंदा करीत नाही. जो त्या आनंदांत दक्ष, सावध, हुशार व स्मृतिमान् होतो, त्यालाच प्राचीन अग्र आर्यवंशाप्रमाणे वागणारा भिक्षु म्हणतात.

भिक्षुहो, हे ते चार आर्यवंश.......ह्यांना कोणत्याही श्रमणांनी व ब्राह्मणांनी दोष लावला नाही.*

* ब्राह्मण प्राचीन वंशपरंपरेला फार महत्त्व देत. पण ती परंपरा महत्त्वाची नसून ह्या सुत्तांत वर्णिलेली आर्यवंशपरंपराच महत्त्वाची, तिला श्रमणब्राह्मण दोष लावूं शकत नाहीत, असा येथे ध्वन्यर्थ आहे.

भिक्षुहो, ह्या चार आर्यवंशांनी समन्वित झालेला भिक्षु जर पूर्व दिशेला जातो, तर तोच अरतीला जिंकतो, अरति त्याला जिंकीत नाही ......पश्चिम......उत्तर......दक्षिण दिशेला जातो, तर तोच अरतीला जिंकतो, अरति त्याला जिंकीत नाही. तें कां? कारण धीर अरतीवर आणि रतीवर जय मिळवतो.

धीराला जिंकणारी अरति नव्हे. अरति धीरावर जय मिळवूं
शकत नाही. अरतीला जिंकणारा धीर तो अरतीवर विजय मिळवितो.
सर्व कर्मांचा त्याग करणाऱ्या व रागद्वेषादिकांचें निरसन
करणाऱ्या त्या धीराच्या आड कोण येईल? शंभर नंबरी सोन्याच्या
नाण्यासारख्या त्याला दोष कोण लावील? देवही त्याची प्रशंसा
करितात, आणि ब्रह्मदेव देखील प्रशंसा करतो.



## अनागतभयानि

हें सुत्त अङ्गुत्तरनिकायाच्या पञ्चकनिपातांत सापडतें. त्याचें रूपांतर येणेंप्रमाणे—

भिक्षुहो, हीं पांच अनागतभयें पाहणाऱ्या भिक्षूला अप्राप्त पदाच्या प्राप्तीसाठी, जें जाणलें नाही तें जाणण्यासाठी, ज्याचा साक्षात्कार झाला नाही त्याच्या साक्षात्कारासाठी, अप्रमत्तपणें उद्यमशीलतेने आणि मन लावून वागण्याला पुरे आहेत. तीं पांच कोणतीं?

येथे, भिक्षुहो, भिक्षु असा विचार करतो की, मी सांप्रत तरुण व यौवनसंपन्न आहे. पण असा एक काळ येईल की, ह्या शरीराला जरा प्राप्त होईल. वृद्धाला, जराजीर्णाला बुद्धाच्या धर्माचें मनन सुकर नाही, अरण्यांत एकान्तवासांत राहणें सुकर नाही. ती अनिष्ट अप्रिय दशा येण्यापूर्वीच म्यां अप्राप्तपदाच्या प्राप्तीसाठी, जें जाणलें नाही तें जाणण्यासाठी, ज्याचा

साक्षात्कार झाला नाही त्याच्या साक्षात्कारासाठी प्रयत्न केलेला बरा! जेणेंकरून वृद्धावस्थेंत देखील मी सुखाने राहूं शकेन. हें पहिलें अनागतभय पाहणाऱ्या भिक्षूला...मन लावून वागायला लावण्यास पुरें आहे.

पुनरपि, भिक्षुहो, भिक्षु असा विचार करतो की, सध्या मी निरोगी आहें, माझा जठराग्नि चांगला आणि प्रयत्नाला अनुकूल आहे. पण असा एक काळ येतो की, हें शरीर व्याधिग्रस्त होतें. व्याधिग्रस्ताला बुद्धाच्या धर्मांचें मनन सुकर नाही, अरण्यांत एकान्तवासांत राहणें सुकर नाही. ती अनिष्ट अप्रिय अवस्था प्राप्त होण्यापूर्वीच म्यां...... प्रयत्न केलेला बरा! जेणेंकरून रुग्णावस्थेंत देखील मी सुखाने राहूं शकेन. हें दुसरें अनागत भय पाहणाऱ्या भिक्षूला......मन लावून वागायला लावण्यास पुरें आहे.

पुनरपि, भिक्षुहो, भिक्षु असा विचार करतो की, सध्या सुभिक्ष आहे, भिक्षा सहज मिळते, भिक्षेवर निर्वाह करणें सोपें आहे. पण असा एक काळ येतो की, दुर्भिक्ष होतें, धान्य पिकत नाही, भिक्षा मिळणें कठिण जातें, भिक्षेवर निर्वाह करणें सोपें नसतें. अशा दुर्भिक्षांत लोक जिकडे सुभिक्ष असेल तिकडे जातात. तेथे गर्दी होते. तशा ठिकाणीं बुद्धाच्या धर्मांचें मनन सुकर नाही, अरण्यांत एकान्तवासांत राहणें सुकर नाही. ती अनिष्ट अप्रिय परिस्थिति प्राप्त होण्यापूर्वीच...प्रयत्न केलेला बरा! जेणेंकरून मी दुर्भिक्षांत देखील सुखाने राहूं शकेन. हें तिसरें अनागत भय पाहणाऱ्या भिक्षूला...मन लावून वागायला लावण्यास पुरे आहे.

पुनरपि, भिक्षुहो, भिक्षु असा विचार करतो की, आजला लोक मुदित मनाने न भांडतां दूध आणि पाणी यांच्याप्रमाणे सख्याने परस्परांविषयीं प्रेमदृष्टि ठेवून वागतात. पण असा एक काळ येतो की, एखादें भीतिप्रद बंड उपस्थित होतें. लोक चीजवस्त घेऊन यानानें किंवा पायीं इकडे तिकडे पळत सुटतात. अशा संकट समयीं लोक जेथे

सुरक्षित स्थान मिळेल, तेथे गोळा होतात. तेथे गर्दी होते. तशा ठिकाणीं बुद्धाच्या धर्माचें मनन सुकर नाही, अरण्यांत एकांतवासांत राहणें सुकर नाही. ती अनिष्ट अप्रिय परिस्थिति प्राप्त होण्यापूर्वीच......प्रयत्न केलेला बरा! जेणेंकरून तशा संकटांत देखील मी सुखाने राहूं शकेन. हें चवथें अनागतभय पाहणाऱ्या भिक्षूला...मन लावून वागायला लावण्यास पुरे आहे.

पुनरपि, भिक्षुहो, भिक्षु असा विचार करतो की, आजला संघ समग्र, संमुदित, भांडणावाचून एका ध्येयाने चालत आहे. पण असा एक काळ येतो की, संघांत फूट पडते. संघांत फूट पडली, तर बुद्धाच्या धर्माचें मनन सुकर नाही, अरण्यांत एकांतवासांत राहणें सुकर नाही. ती अनिष्ट अप्रिय परिस्थिति प्राप्त होण्यापूर्वीच...प्रयत्न केलेला बरा! जेणेंकरून त्या प्रतिकूल परिस्थितींत देखील मी सुखाने राहूं शकेन. हें पांचवें अनागतभय पाहणाऱ्या भिक्षूला...मन लावून वागायला लावण्यास पुरे आहे.

भिक्षुहो, हीं पांच अनागतभयें पाहणाऱ्या भिक्षूला, अप्राप्त पदाच्या प्राप्तीसाठी, जें जाणलें नाही तें जाणण्यासाठी, ज्याचा साक्षात्कार झाला नाही त्याच्या साक्षात्कारासाठी अप्रमत्तपणे उद्यमशीलतेने आणि मन लावून वागायला लावण्यास पुरे आहेत.



## मुनिगाथा

हें मुनिसुत्त या नांवाने सुत्तनिपातांत सापडतें. त्याचें भाषांतर येणेंप्रमाणे—

स्नेहामुळे भय उत्पन्न होतें व घरापासून मळ उद्भवतो; यास्तव अनागारिकता आणि निःस्नेहता हेंच मुनीचें तत्त्वज्ञान समजावें. १

जो उद्भवलेल्या मनोदोषाचा उच्छेद करून त्याला पुनः वाढू देत नाही व त्याविषयी स्नेह बाळगीत नाही, त्या एकाकी राहणाऱ्याला मुनि म्हणतात. त्या महर्षीने शान्तिपद पाहिलें.

पदार्थ व त्यांचीं बीजें जाणून* जो त्यांना स्नेह (ओलावा) देत नाही, तो खरोखर जन्मक्षयान्तदर्शी मुनि होय. तो तर्क सोडून देऊन नामाभिधान (जन्म) पावत नाही. ३

जो सर्व अभिनिवेश जाणतो व त्यांपैकी एकाचीही इच्छा धरीत नाही, तो वीततृष्ण निर्लोभी मुनि अस्थिर होत नाही; कारण तो पार जातो. ४

जो सर्व जिंकणारा, सर्व जाणणारा, सुबुद्धि, सर्व पदार्थांपासून अलिप्त राहणारा, सर्वत्यागी व तृष्णेच्या क्षयाने मुक्त झालेला, त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. ५

प्रज्ञा ज्याचें बळ, जो शीलाने व व्रताने संपन्न, समाहित, ध्यानरत, स्मृतिमान्, संगापासून मुक्त, काठिन्यरहित व अनाश्रव, त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. ६

एकाकी राहणारा, अप्रमत्त, मुनि, निंदेने आणि स्तुतीने न गडबडणारा, सिंहाप्रमाणे शब्दांना न घाबरणारा, वाऱ्याप्रमाणे जाळ्यांत न अडकणारा, पाण्यांतील कमलाप्रमाणे अलिप्त राहणारा, इतरांचा नेता असून ज्याला नेता नाही, अशाला त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. ७

ज्याच्याविषयीं लोक वाटेल तें बोलले, तरी जो घाटावरील स्तंभाप्रमाणे† स्थिर राहतो, जो वीतराग व सुसमाहितेंद्रिय, त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. ८

---

* पालि शब्द 'पमाय'. टीकाकाराने याचा 'हिंसित्वा वधित्वा' असा अर्थ केला आहे. पण प्रपूर्वक मा धातूचा अर्थ मोजणें, किंवा यथार्थतया जाणणें असा होतो.

† नदीच्या घाटावर चौकोनी किंवा अष्टकोनी खांब बांधीत असत. त्यावर सर्व जातीचे लोक स्नान करतांना पाठ घाशीत.

जो स्थितात्मा धोट्याप्रमाणे* सरळ जातो, पापकर्मांचा तिरस्कार करतो, विषमाची आणि समाची पारख करतो, त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. ९

लहान असो वा मध्यम वयाचा असो, जो संयतात्मा मुनि पाप करीत नाही, जो यतात्मा रागावत नाही व दुसऱ्या कोणालाही राग आणीत नाही, त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. १०

इतरांनी दिलेल्या अन्नावर उपजीविका करणारा, जो शिजविलेल्या अन्नांतून आरंभीं, मध्याला अथवा शेवटीं भिक्षा मिळाली असतां स्तुति किंवा निंदा करीत नाही, त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. ११

जो मुनि स्त्रीसंगापासून विरत झाला, तारुण्यात असूनही कोठेच बद्ध होत नाही, जो मदप्रमादापासून विरत, जो मुक्त, त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. १२

इहलोक जाणून ज्याने परमार्थ पाहिला. ओघ व समुद्र तरून जो तादृग्भाव पावला, ज्याने बंधनें (ग्रंथि) तोडलीं, जो अनाश्रित व अनाश्रव, त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. १३

बायकोला पोसणारा गृहस्थ आणि निर्मम मुनि या दोघांची राहणी व वृत्ति फार भिन्न आहे. कारण, प्राणघात होऊं न देण्याविषयीं गृहस्थ संयम बाळगीत नाही, पण मुनि सदोदित प्राण्यांचें रक्षण करतो. १४

जसा आकाशांत उडणारा नीलग्रीव मोर हंसाच्या वेगाने जाऊं शकत नाही, तसा गृहस्थ एकान्तीं वनांत ध्यान करणाऱ्या भिक्षु मुनीचें अनुकरण करूं शकत नाही. १५



## मोनेय्यसुत्त

हें 'नालकसुत्त' या नांवाने सुत्तनिपातांत आढळतें. याच्या प्रास्ताविक गाथा २० आहेत. त्यांचें भाषांतर येथे देत नाही. जिज्ञासूंनी जून

---

* धोटा विषम व सम धाग्यातून सरळ जातो व धाग्यांत बद्ध होत नाही, त्याप्रमाणे सरळ जातो.

१९३७ चा विविधज्ञानविस्ताराचा अंक पाहावा. त्यांत या सुत्ताचें प्रास्ताविक गाथांसह भाषांतर दिलें आहे. नालक असित ऋषीचा भाचा. तो अल्पवयी होता तेव्हा गोतम बोधिसत्त्व जन्मला. असितऋषीने बोधिसत्त्वाचें भविष्य वर्तविलें की, तो थोर मुनि होणार. आणि नालकाला गोतम बुद्धाच्या धर्माला अनुसरण्याचा त्याने उपदेश केला. नालक मामाच्या वचनावर श्रद्धा ठेवून गोतम बोधिसत्त्व बुद्ध होईपर्यंत तापसी होऊन राहिला; आणि जेव्हा गोतमाला बुद्धपद प्राप्त झालें, तेव्हा त्याजपाशीं येऊन त्याने मौनेयाबद्दल प्रश्न विचारले. त्या प्रश्नांपासून या सुत्ताला सुरवात होते.

(तूं श्रेष्ठ मुनि होणार) हें असिताचें वचन यथार्थ आहे असें मी जाणलें. आणि म्हणून सर्व वस्तुजाताच्या पार गेलेल्या गोतमाला मी विचारतों. १

हे मुने, गृहत्याग करून भिक्षेवर उपजीविका करणाऱ्याला उत्तम पद असें मौनेय कोणतें हें विचारतों, तें मला सांग. २

मौनेय कोणतें हें मी तुला सांगतों—असें भगवान म्हणाला—तें दुष्कर आणि दुरभिसंभव आहे: तथापि मी तें तुला सांगतों. संभाळून वाग व दृढ हो. ३

गावांत कोणी निंदा केली किंवा स्तुति केली असतां सर्वांविषयी समानभाव बाळगावा. मनांतल्या मनांत क्रोध आवरावा, शांत आणि निगर्वी व्हावें. ४

पेटलेल्या अरण्यांतील अग्निज्वालांप्रमाणें गावांत स्त्रिया फिरतात. या मुनीला भुलवितात. त्यांनी तुला मोहांत पाडूं नये याबद्दल सावध रहा. ५

लहानमोठे कामोपभोग सोडून स्त्रीसंगापासून विरत हो. स्थिरचर प्राण्यांचा विरोध आणि आसक्ति सोड. ६

जसा मी तसे हे, व जसे ते तसा मी, असें आपल्या उदाहरणानें जाणून कोणाला मारूं नये व मारवूं नये. ७

ज्या इच्छेंत आणि लोभांत सामान्यजन बद्ध होतो, त्या इच्छेचा आणि लोभाचा त्याग करून चक्षुष्मन्ताने हा नरक तरून पार जावें. ८

पोटभर चापून न खाणारा, मिताहारी, अल्पेच्छ व अलोलुप व्हावें. तोच इच्छा सोडून तृप्त झालेला अनिच्छ शांत होतो. ९

मुनीने भिक्षाटन करून वनांत यावें व तेथे झाडाखाली आसना-वर बसावें. १०

त्या ध्यानरत धीर पुरुषाने वनांत आनंद मानावा. त्याने झाडा खाली बसून मनाला संतोषवीत ध्यान करावें. ११

त्यानंतर रात्र संपल्यावर गावांत यावें. तेथे मिळालेल्या आमं-त्रणाने किंवा भेटीने उल्लसित होऊं नये. १२

मुनीने गावांतील कुटुंबांशीं सलगी करूं नये, भिक्षेसंबंधीं कांही बोलूं नये, सूचक शब्द उच्चारूं नयेत. १३

भिक्षा मिळाली तरी चांगलें, न मिळाली तरी चांगलें. दोन्हीविषयीं तो समभाव ठेवतो व (आपल्या राहण्याच्या) झाडापाशीं येतो. १४

हातांत भिक्षापात्र घेऊन फिरणाऱ्याने त्याने मुका नसतां मुक्या सारखें वागावें आणि मिळालेल्या अल्प भिक्षेचा तिरस्कार व दात्याचा अनादर करूं नये. १५

श्रमणाने (बुद्धाने) हीन मार्ग कोणता व उत्तम मार्ग कोणता याचें स्पष्टीकरण केलें आहे. संसाराच्या पार दोनदा जात नसतात, तरी पण ज्ञान एकाच प्रकारचें असतें असें नाही. १६

ज्या भिक्षूला आसक्ति नाही, ज्याने संसारस्रोत तोडलें व जो कृत्याकृत्यांपासून मुक्त झाला, त्याला परिदाह राहत नाही. १७

तुला मी मौनेय सांगतों,–असें भगवान म्हणाला– क्षुरधारेवरील मध चाटणाऱ्या माणसाप्रमाणे सावध व्हावें; जीभ ताळूला लावून देखील जेवणांत संयम बाळगावा. १८

सावधचित्त व्हावें, पण फार चिंतनही करूं नये; हीन विचारांपासून मुक्त, अनाश्रित आणि ब्रह्मचर्यपरायण व्हावें. १९

एकांतवासाची आणि श्रमणोपासनेची (ध्यानचिंतनाची) आवड धरावी. एकाकीपणाला मौन म्हणतात. जर एकाकी राहण्यांत तुला आनंद वाटूं लागेल, २०

तर ध्यानरत कामत्यागी धीरांचें वचन ऐकून तूं दशदिशा प्रकाशित करशील. तरी (त्या पदाला पोचलेल्या) माझ्या श्रावकानें न्ही (पापलज्जा) आणि श्रद्धा वाढवावी. २१

तें नद्यांच्या उपमेने जाणावें. ओढे धबधब्यावरून खिंडींतून मोठा आवाज करीत वाहतात; पण मोठ्या नद्या संथपणें जातात. २२

जें उथळ तें खळखळतें, पण जें गंभीर तें संथच असतें. मूढ अर्ध्या घड्याप्रमाणे खळखळतो; पण सुज्ञ गंभीर जलन्हदाप्रमाणे शांत असतो. २३

श्रमण (बुद्ध) जें पुष्कळ बोलतो तें योग्य आणि उपयुक्त असें जाणून बोलतो. जाणून तो धर्मोपदेश करतो व जाणून पुष्कळ बोलतो. (२४)

पण जो संयतात्मा जाणत असूनही पुष्कळ बोलत नाही, तो मुनि मौनाला योग्य आहे, त्या मुनीनें मौन जाणलें. (२५)



## उपतिस्सपसिने

हें 'सारिपुत्तसुत्त' या नांवानें सुत्तनिपातांत सापडतें. अट्ठकथेंत याला थेरपञ्ह असेंही म्हटलें आहे. त्यावरून असें दिसतें की, याला सारिपुत्तपञ्ह किंवा उपतिस्सपञ्ह असेंही म्हणत असावें. त्याचें भाषांतर येणेंप्रमाणे—

आयुष्मान् सारिपुत्त म्हणाला,—असा गोड बोलणारा, संतुष्ट* व संघाचा पुढारी शास्ता, मी यापूर्वी पाहिला नाही किंवा ऐकला नाही. १

सर्व तमाचा नाश करून श्रमणधर्मांत रत झालेला असा हा सदेवक जगाला एकच चक्षुष्मान् दिसत आहे. २

अनाश्रित व अदांभिक अशा त्या बुद्धपदाला पावलेल्या संघ-नायकापाशीं मी पुष्कळ बद्ध माणसांच्या हितेच्छेने प्रश्न विचारण्यास आलों आहें. ३

संसाराला कंटाळून झाडाखाली स्मशानांत किंवा पर्वतांच्या गुहांमध्ये एकान्तवास सेवन करणाऱ्या भिक्षूला, ४

तशा त्या बऱ्यावाईट स्थळीं भयें कोणतीं? त्या निःशब्द प्रदेशांत कोणत्या भयांना त्या भिक्षूने घाबरतां कामा नये! ५

अमृत दिशेला जाण्यासाठी सुदूर प्रदेशांत वास करणाऱ्या भिक्षूने कोणतीं विघ्नें सहन केलीं पाहिजेत? ६

त्या दृढनिश्चयी भिक्षूची वाणी कशी असावी? त्याची राहणी कशी असावी? आणि त्याचें शील व व्रत कसें असावें? ७

सोनार जसा रुपें आगींत घालून त्यांतील हिणकस काढतो, त्याप्रमाणें समाहित, सावध आणि स्मृतिमान् भिक्षूने कोणता अभ्यासक्रम स्वीकारून आपलें मालिन्य जाळून टाकावें? ८

भगवान म्हणाला, हे सारिपुत्त, संसाराला कंटाळून एकान्तवास सेवन करणाऱ्या संबोधिपरायण भिक्षूचें जें मला कर्तव्य वाटतें तें मी तुला सांगतों. ९

---

* संतुष्ट शब्दाबद्दल मुळांत 'तुसितो' आहे. पण अट्ठकथेंत तुसिता असा पाठ असून त्याचा तुषितदेवलोकांतून इहलोकीं आलेला असा अर्थ केला आहे.

एकान्तवासांत राहणाऱ्या स्मृतिमान् धीर भिक्षूने पांच भयांना भिऊं नये. डासांच्या चावण्याला, सर्पांना, मनुष्यांच्या उपद्रवाला, चतुष्पदांना, १०

आणि परधर्मिकांना घाबरूं नये. परधर्मिकांचीं पुष्कळ भेसूर कृत्यें पाहून देखील त्यांना घाबरूं नये. आणि त्या कुशलान्वेषी भिक्षूने दुसरींही विघ्नें सहन करावीं. ११

रोगाने आणि भुकेने उत्पन्न होणारा त्रास, थंडी व उन्हाळा त्याने सहन करावा. त्या विघ्नांची अनेकविध बाधा झाली, तरी अनागरिक राहून त्याने आपला उत्साह, पराक्रम दृढ करावा. १२

त्याने चोरी करूं नये, खोटें बोलूं नये, स्थिरचर प्राण्यांवर मैत्रीची भावना करावी आणि मनाचा कलुषितपणा मारपक्षीय जाणून दूर करावा. १३

त्याने क्रोधाला व अतिमानाला वश होऊं नये, त्यांचीं मुळेंपाळें खणून काढावीं, आणि खात्रीने वृद्धिमार्गगामी होऊन प्रियाप्रिय सहन करावें. १४

कल्याणप्रिय माणसाने प्रज्ञेला महत्त्व देऊन तीं विघ्नें सहन करावीं, एकान्तवासांत असंतोष वाटला, तर तोही सहन करावा, आणि चार शोकप्रद गोष्टी सहन कराव्या. १५

(त्या ह्या—) मी आज काय खाईन वा कोठे जेवीन, गेल्या रात्रीं झोप न आल्यामुळे त्रास झाला, आज कोठे झोपावें? अनागरिक शैक्ष्याने (सेख) हे (चार) वितर्क त्यागावे. १६

वेळोवेळीं अन्न आणि वस्त्र मिळालें असतां त्यांत प्रमाण ठेवावें, अल्पसंतोषी व्हावें. त्या पदार्थांपासून मनाचें रक्षण करणाऱ्या व गावांत संयमाने वागणाऱ्या भिक्षूने, इतरांनी राग येण्याजोगें कृत्य केलें असतांही, कठोर वचन बोलूं नये. १७

त्याने आपली दृष्टि पायांपाशीं ठेवावी, चंचळपणे चालूं नये, ध्यानरत व जागृत असावें, उपेक्षेचा अवलंब करून चित्त एकाग्र करावें, तर्क आणि चांचल्य यांचा नाश करावा. १८

त्या स्मृतिमन्ताने आपले दोष दाखविणाऱ्यांचें अभिनन्दन करावें, सब्रह्मचाऱ्यांविषयीं कठोरता बाळगूं नये, प्रसंगोपात्त चांगलेच शब्द बोलावे, लोकांच्या वादविवादांत शिरण्याची इच्छा धरूं नये. १९

तदनंतर स्मृतिमन्ताने जगांतील पांच रजांचा त्याग करण्यास शिकावें. (म्हणजे) रूप, शब्द, गंध, रस आणि स्पर्श (या पांच रजांचा) यांचा लोभ धरूं नये. २०

या पदार्थांचा छन्द सोडून तो स्मृतिमान्, सुविमुक्तचित्त, वेळोवेळीं सद्धर्माचें चिंतन करणारा, एकाग्रचित्त भिक्षु अंधकाराचा नाश करण्याला समर्थ होईल (असें भगवान म्हणाला). २१



## राहुलोवादसुत्त

याला चूळराहुलोवाद आणि अम्बलट्ठिकराहुलोवाद असेंही म्हणतात. हें मज्झिमनिकायांत आहे. त्याचा गोषवारा असा--

एके समयीं बुद्ध भगवान राजगृहापाशीं वेणुवनांत राहत होता, व राहुल अम्बलट्ठिका * नांवाच्या ठिकाणीं राहत होता. एके दिवशीं संध्याकाळीं भगवान ध्यानसमाधि आटपून राहुल राहत होता तेथे गेला. राहुलाने भगवन्ताला दुरून पाहून आसन मांडलें व पाय धुण्यासाठी पाणी आणून ठेवलें. भगवान आला व त्या आसनावर बसून त्याने पाय धुतले. राहुल भगवन्ताला नमस्कार करून एका बाजूला बसला.

---

*हा एक प्रासाद होता असें अट्ठकथेंत म्हटलें आहे. पण तें संभवनीय दिसत नाही. राजगृहापाशी हा एक गांव होता असें वाटतें.

भगवन्ताने पाय धुण्याच्या पात्रांत स्वल्प पाणी शिल्लक ठेवलें, आणि भगवान राहुलाला म्हणाला, "राहुल, हें तूं स्वल्प पाणी पाहतोस काय?"

"होय भदन्त," राहुलाने उत्तर दिलें.

"राहुल, ज्यांना खोटें बोलण्याला लाज वाटत नाही, त्यांचें श्रामण्य या पाण्याप्रमाणें क्षुल्लक आहे."

नंतर तें पाणी फेकून देऊन भगवान म्हणाला, "राहुल हें फेकलेलें पाणी तूं पाहतोसना?"

"होय भदन्त" असें राहुलाने उत्तर दिलें.

"राहुल, ज्यांना खोटें बोलण्याला लाज वाटत नाही त्यांचें श्रामण्य या पाण्याप्रमाणें त्याज्य आहे."

नंतर तें पात्र पालथें करून भगवान म्हणाला, "राहुल, ज्यांना खोटें बोलण्याला लाज वाटत नाही त्यांचें श्रामण्य या भांड्याप्रमाणें पालथें समजलें पाहिजे."

नंतर तें सुलटें करून भगवान म्हणाला, "राहुल, हें रिकामें पात्र तूं पाहत आहेस ना?"

"होय भदन्त" राहुलाने उत्तर दिलें.

"राहुल, ज्यांना खोटें बोलण्याला लाज वाटत नाही, त्यांचें श्रामण्य ह्या भांड्याप्रमाणें रिकामें आहे.

"हे राहुल, लढाईसाठी सज्ज केलेला राजाचा मोठा हत्ती, पायांनी लढतो, डोक्याने लढतो, कानांनी लढतो,* दातांनी लढतो, शेपटीने लढतो,* पण एक तेवढी सोंड राखतो. तेव्हा माहुताला वाटतें की,

*कानांनी बाण बचावण्याचें काम करतो, शेपटीला बांधलेल्या दगडी किंवा लोखंडी दांड्याने फोडतोड करतो, असा अट्ठकथेंत अर्थ केला आहे.

एवढा मोठा हा राजाचा हत्ती सर्व अवयवांनी लढतो, फक्त सोंड राखतो; संग्रामविजयाला त्याने जीवित अर्पण केलें नाही. जर त्या हत्तीने इतर अवयवांबरोबर सोंडेचाही पूर्णपणें उपयोग केला, तर माहुत समजतो की, हत्तीने संग्रामविजयाला आपलें जीवित अर्पण केलें आहे, आता त्याच्यांत कमीपणा राहिला नाही. त्याचप्रमाणें ज्यांना खोटें बोलण्यास लाज वाटत नाही, त्यांनी कोणतेंही पाप सोडलें नाही असें मी म्हणतों.* म्हणून, हे राहुल, थट्टेने देखील खोटें बोलावयाचें नाही असा अभ्यास कर.

"राहुल, आरशाचा उपयोग कोणता?"

"प्रत्यवेक्षण (निरीक्षण) करण्यासाठी, भदन्त," राहुलाने उत्तर दिलें.

"त्याचप्रमाणें, राहुल, पुनःपुनः प्रत्यवेक्षण (नीट विचार) करून कायेने, वाचेने आणि मनाने कर्मे करावीं.

"जेव्हा तूं, राहुल, कायेने, वाचेने अथवा मनाने एखादें कर्म करूं इच्छिशील, तेव्हा प्रथमतः त्याचें प्रत्यवेक्षण कर आणि तें जर आत्मपरहिताच्या आड येणारें व परिणामीं दुःखकारक असें दिसून आलें तर तें मुळीच अमलांत आणूं नकोस. पण तें आत्मपरहिताच्या आड येणारें नसून परिणामीं सुखकारक आहे असें दिसून आलें, तर तें आचर.

"कायेने, वाचेने अथवा मनाने कर्म आरंभिलें असतांही त्याचें प्रत्यवेक्षण कर आणि तें आत्मपरहिताच्या आड येणारें असून परिणामीं दुःखकारक आहे असें दिसून आल्यास तेवढ्यावरच सोडून दे. पण तें आत्मपरहिताच्या आड येणारें नसून परिणामीं सुखकारक आहे असें दिसून आल्यास, वारंवार करीत जा.

---

* असत्य राखून इतर पापांचा त्याग केला, तर श्रमण खरा योद्धा नव्हे; त्याने श्रामण्याला आपलें जीवित अर्पण केलें नाही.

"कायेने, वाचेने अथवा मनाने कर्म केल्यानंतर देखील तूं त्याचें प्रत्यवेक्षण कर आणि तें कायिक अथवा वाचसिक कर्म आत्मपरहिताच्या आड येणारें व परिणामीं दुःखकारक होतें असें दिसून आल्यास शास्त्यापाशीं किंवा विद्वान् सब्रह्मचाऱ्यांपाशीं तूं त्या पापाचा आविष्कार कर (तें कबूल करावें), आणि पुनः आपणाकडून तसें कर्म घडूं नये अशी काळजी बाळग. तें मनःकर्म असेल, तर त्याबद्दल पश्चात्ताप कर, लाज धर, व पुनः तो विचार मनांत येऊं देऊं नकोस. पण कायेने, वाचेने अथवा मनाने केलेलें कर्म आत्मपरहिताच्या आड येणारें नसून परिणामीं सुखकारक होतें असें दिसून आल्यास मुदित मनाने तें कर्म पुनः पुनः करण्याला शीक.

"हे राहुल, अतीतकालीं ज्या श्रमणब्राह्मणांनी आपलीं कायिक, वाचसिक आणि मानसिक कर्में परिशुद्ध केलीं, त्यांनी तीं पुनःपुनः प्रत्यवेक्षण करूनच परिशुद्ध केलीं. भविष्यकालीं जे श्रमणब्राह्मण हीं कर्में परिशुद्ध करितील, ते पुनःपुनः प्रत्यवेक्षण करूनच हीं कर्में परिशुद्ध करितील. सांप्रत जे श्रमणब्राह्मण हीं कर्में परिशुद्ध करतात, ते पुनःपुनः प्रत्यवेक्षण करूनच हीं कर्में परिशुद्ध करतात. म्हणून हे राहुल, पुनःपुनः प्रत्यवेक्षण करून कायिक, वाचसिक आणि मानसिक कर्में परिशुद्ध करण्यास शीक."

असें भगवान बोलला. आयुष्मान् राहुलाने मुदित मनाने भगवन्ताच्या भाषणाचें अभिनंदन केलें.



ह्या सात सुत्तांपैकी सुत्तनिपातांत असलेलीं, मुनिगाथा, नाळकसुत्त व सारिपुत्तसुत्त हीं तीन पद्यांत व बाकी चार गद्यांत आहेत. गद्य सुत्तांत पुनरुक्ति फार आढळते. त्या काळच्या वाङ्मयाची ही पद्धति समजली पाहिजे. कां की, जैनांच्या सूत्रांत आणि कांही ठिकाणीं

उपनिषदांत देखील अशी पुनरुक्ति आहे. पण ती त्रिपिटकांत एवढी आहे की, हें सर्व पूर्ववत् असावें असें वाचकाला वाटतें आणि एखादा महत्त्वाचा मुद्दा त्या पुनरुक्तींत तसाच राहून जातो; त्याच्याकडे वाचकाचें लक्ष जात नाही. उदाहरणार्थ, ह्या राहुलोवादसुत्तांत कायिक, वाचसिक आणि मानसिक कर्मांच्या प्रत्यवेक्षणांत तोच तोच मजकूर पुनःपुनः आला आहे. परंतु कायिक आणि वाचसिक अकुशल कर्म आचरणांत आलें, तर शास्त्यापाशीं किंवा विद्वान् सब्रह्मचाऱ्यांपाशीं त्याचा आविष्कार करावा, व तसें कर्म पुन: होऊं देऊं नये असें म्हटलें आहे. मानसिक अकुशलाला हा नियम लागू केला नाही. कां की, विनयपिटकांत कायिक आणि वाचसिक दोषांनाच आविष्कारादिक (पापदेशना इत्यादिक) प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत; मनोदोषासाठी प्रायश्चित्तविधान नाही. त्याला प्रायश्चित्त म्हटलें म्हणजे त्याबद्दल पश्चात्ताप करावा व लाज धरावी आणि तसा अकुशल विचार पुनः मनांत आणूं नये. कायिक व वाचसिक अकुशल कर्मांतील आणि मानसिक अकुशल कर्मांतील हा फरक राहुलोवादसुत्त वरवर वाचणाऱ्याच्या लक्षांत यावयाचा नाही.

अशोकाच्या वेळीं हीं सर्व सुत्तें अशींच होतीं, की संक्षिप्त होतीं हें सागतां येणें कठीण आहे. तीं संक्षिप्त असलीं तरी सारभूत मजकूर हाच होता यांत शंका नाही. सुत्तपिटकांतील प्राचीनतम सुत्तें ओळखण्याला हीं सात सुत्तें फार उपयोगी आहेत.



# सूची